बक्षीस देण्यास, लायब्ररींकरितां घेण्यास व शाळांत चालविण्यास मंजूर केलेला ग्रंथ.

# गलिव्हर याचा वृत्तांत.

## भाग पहिला.

## लिलिपटची सफर.

हा ग्रंथ

इंग्रजींतील स्विफ्टकृत 'गलिव्हर्स ट्राव्हल्स' या ग्रंथावरून

हरि कृष्ण दामले

यांनीं लिहिला.

चित्रयुक्त आवृत्ति चौथी.

सन १९०८.

किंमत ५ आणे.

# पहिल्या तीन आवृत्तींची प्रस्तावना.

ऐर्लंड देशांत स्विफ्ट् नामेंकरून एक मोठा विख्यात ग्रंथकार गेल्या शतकांत होऊन गेला. त्याचा अत्यंत प्रसिद्ध ग्रंथ 'गलिव्हर्स् ट्राव्हल्स' हा होय. ह्या ग्रंथाचे एकंदर चार भाग आहेत; त्यांपैकीं पहिल्या भागाचें हें भाषांतर मराठी वाचकांकरितां तयार केलें आहे.

सदरील ग्रंथाचा मुख्य उद्देश मनोरंजन हा तर आहेच; पण मूळ ग्रंथकाराचा उद्देश याहूनही खोल होता. तो हा कीं, त्या वेळेस जें मंत्रिमंडळ होतें, जीं राजकारस्थानें चालत असत, जे विख्यात विद्वान् लोक होते, आणि एकंदर जी राज्यव्यवस्था व लोकस्थिति होती, त्यांविषयीं उपरोधोक्तीनें लिहून त्यांचा उपहास करावा. हा त्याचा गुप्त हेतु त्या वेळेसही सामान्य वाचकांस प्रथमतः कळून आला नाहीं; व हल्लीं तर त्या काळाला सुमारें दीडशें वर्षें लोटून गेल्याकारणानें वरील उपरोधोक्तीचा रोंख स्पष्टपणें ध्यानांत येण्यास फारसा मार्गही उरला नाहीं. तरी ग्रंथकारानें आपल्या पात्रांच्या तोंडून जे अभिप्राय वदवले आहेत, त्यांवरून मार्मिक वाचकांस सदरील प्रकार जागोजाग आढळल्यावांचून राहणार नाहीं.

हें भाषांतर केवळ शब्दशः केलें नसून मराठी भाषेला जसें गोड दिसेल तसें उतरलें आहे. कांहीं ठिकाणीं थोडेबहुत फेरफारही करावे लागले आहेत. तर एकंदरीनें पाहतां हा ग्रंथ सामान्य वाचकांस व इंग्रजी शिकणारांसही उपयोगी पडेल असा आहे.

हें भाषांतर ग्रंथकर्त्याचे परमपूज्य गुरु कै० विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या सांगण्यावरून तयार केलें असून त्यांनीं

तें वाचून पाहून दुरुस्त केलें होतें, यास्तव याच्या यशाचा पुष्कळ अंश त्यांजकडे जातो हें येथें सांगणें इष्ट आहे.

या ग्रंथाची दुसरी आवृत्ति चित्रें घालून छापिली होती; पण तीं चित्रें शिळाछापाचीं असल्यामुळें सुरेख निघालीं नव्हतीं. परंतु मे० डायरेक्टर ऑफ् पब्लिक इन्स्ट्रक्शन साहेब बहादूर यांनीं हा ग्रंथ शाळाखात्यांत बक्षिसांकरितां व लायब्र्यांकरितां मंजूर केल्यामुळें यास त्यांचा नेहमींचा आश्रय मिळाला; सबब, याची तिसरी आवृत्ति छापते वेळीं मुद्दाम विलायतेहून ठसे आणवून त्यांवरून चित्रें छापून घातलीं. या ग्रंथास हें स्वरूप येण्यास वरील साहेब बहादुरांचा उदार आश्रय हेंच मुख्य कारण आहे, व त्याबद्दल ग्रंथकर्ता त्यांचा अत्यंत आभारी आहे. त्याचप्रमाणें या ग्रंथास वऱ्हाड व नागपूर येथील विद्याखात्यांचे अधिकाऱ्यांकडून व कांहीं संस्थानिकांकडून आश्रय मिळाला, त्याबद्दल ग्रंथकर्ता त्यांचाही फार आभारी आहे.

**हरि कृष्ण दामले.**

पुणें, ता० १ मे १८९०.

---

## चौथी आवृत्ति.

मूळ इंग्लिश ग्रंथाचा कर्ता डॉ० स्विफ्ट् याचें चरित्र तिसऱ्या आवृत्तीच्या वेळीं या ग्रंथास जोडलें होतें तें हल्लीं निराळें छापलेलें असल्यामुळें या आवृत्तींतून कमी केलें आहे. बाकीची बहुतेक सर्व व्यवस्था पूर्वींप्रमाणेंच कायम ठेविली आहे. हल्लीं हा ग्रंथ मे० डायरेक्टर साहेब यांनीं शाळांत चालविण्यास मंजूर केला आहे, याबद्दल ग्रंथकर्ता त्यांचा फार ऋणी आहे.

**हरि कृष्ण दामले.**

पुणें, ता० १ जानेवारी १९०८.

# गलिव्हर याचा वृत्तांत.

## भाग पहिला.

### लिलिपटची सफर.

#### प्रकरण १.

इंग्लंड देशामध्यें नॉटिंगहम् नामक प्रांतांत माझे बापाची कांहीं जिंदगी होती. आम्ही पांच भाऊ; त्यांत मी तिसरा. माझें वय चवदा वर्षांचें झाल्यावर माझ्या बापानें मला केंब्रिज येथील इम्यान्युअल् नामक विद्यालयांत अभ्यासास ठेविलें. त्या ठिकाणीं तीन वर्षें राहून मीं मन लावून चांगला अभ्यास केला. तेथं जरी मला फार खर्च लागत नव्हता, तरी आमच्या गृहस्थितीच्या मानानें तो भारीच होता. यास्तव पुढें मला लंडन येथील मिस्टर जेम्स बेट्स् नामक प्रख्यात वैद्याचे [illegible] वैद्यकीचा अभ्यास करण्यास ठेविलें. तेथें माझे बापाकडून मला जो पैसा मिळत असे, त्यापैकीं बराच शिल्लक राहत असे. तो मीं नौकानयन व इतर प्रकारचें गणित शिकण्यांत खर्च केला. या अभ्यासांत विशेषतः प्रवासी लोकांस उपयोगीं पडणाऱ्या गोष्टींकडेच मीं फार करून लक्ष दिलें. कारण काय असेल तें असो, आपणास पुढें खचीत कधीं तरी प्रवास करावा लागणार, हे माझ्या मनांत पहिल्यापासून येऊन चुकलें होतें. बेट्स् याचे घरीं चार वर्षें राहून पुढें मी घरीं गेलों. तेथें माझ्या बापाच्या, चुलत्याच्या, व इतर आप्तांच्या संमतीनें असें ठरलें कीं, मीं लेडन नामक शहरीं आणखी कांहीं दिवस राहून वैद्यकीचा अभ्यास

करावा. त्याप्रमाणें सदहू ठिकाणीं सुमारें अडीच वर्षे अभ्यास केल्यावर मी वैद्यकांत बराच पारंगत झालों.

लेडेन येथून परत आल्यावर माझा पूर्वीचा शिक्षक बेट्स् ह्यानें माझी वैद्यकांत हुशारी पाहून कप्तान अब्राहाम पनेल नामक गृहस्थापाशीं माझी शिफारस केली. हा गृहस्थ एका जहाजावरचा मुख्य अधिकारी होता. त्यानें मला त्याच जहाजावर आपले हाताखालीं वैद्याची जागा दिली. अब्राहाम पनेल याजबरोबर मीं सुमारें तीन साडेतीन वर्षें राहून भूमध्य व इतर कांहीं समुद्रांची सफर केली. ही सफर करून परत आल्यावर मीं लंडन येथें स्थाईक राहण्याचा विचार केला. ह्या कामांत मला बेट्स यानें चांगलें साह्य केलें. त्यानें पुष्कळ ठिकाणीं माझी ओळखपाळख करून दिली, व त्यामुळें माझा वैद्यकीचा धंदा बराच चालूं लागला. पुढें कांहीं दिवसांनीं मीं एक घरही घेतलें. सारांश, याप्रमाणें माझें चांगलें बस्तान बसलें. तेव्हां अर्थातच एकटा फटिंग राहणें मला आवडेना. यास्तव मिस् मेरी बर्टन् नांवाच्या स्त्रीशीं मीं लग्न केलें. तिच्या बापाकडून मला चार हजार रुपये आंदण मिळाले.

पुढें दोन वर्षांनीं बेटस् हा मरण पावला; व त्यामुळें माझा वशिला नाहींसा होऊन माझा धंदा दिवसेंदिवस चांगला चालेनासा झाला. सबब पैशाच्या टंचाईमुळें मला दुसरा कांहीं उद्योग पाहणें भाग पडलें. तेव्हां मीं आपल्या बायकोच्या व कांहीं स्नेही मंडळीच्या संमतीनें पुनः दर्यावरची नोकरी धरिली. हा माझा प्रवास सुमारें सहा वर्षे लांबला; व एवढ्या काळांत आम्हीं हिंदुस्थानच्या व अमेरिकेच्या बऱ्याच खेपा केल्या. मला ह्या वेळीं म्हणण्यासारखा जरी नाहीं, तरी कांहीं पैसा मिळाला. मजकडे अर्थात् पूर्वीप्रमाणें वैद्यगिरीचें काम होतें, व त्यामुळें मला पुष्कळ रिकामपण

सांपडे. आमचेबरोबर सर्वमान्य अशा प्राचीन व अर्वाचीन ग्रंथांचा भरणा चांगला होता, व या रिकामपणांत मीं त्यांपैकीं बरेच ग्रंथ पाहिले. ही गोष्ट समुद्रावरची झाली. जेव्हां आम्ही देशावर असूं, तेव्हां मी आपला रिकामा वेळ त्या त्या देशच्या लोकांची भाषा शिकण्यांत व रीतरिवाजांची माहिती करून घेण्यांत घालवीं. ह्या कामीं मला माझी स्मरणशक्ति फार उपयोगीं पडली.

वर सांगितल्यापैकीं शेवटल्या खेपेस मला फारच त्रास झाला; तो इतका कीं, पुनः समुद्राचें दर्शन सुद्धां घेऊं नये असें झालें. सबब मीं असा निश्चय केला कीं, जी काय ओली कोरडी भाकर मिळेल ती खाऊन स्वस्थ गृहास्थितीचें सुख घ्यावें हें बरें. याप्रमाणें मीं घरीं आल्यावर पूर्ववत् उद्योग आरंभिला. पण मजवर शनीमहाराजांची पूर्ण कृपा! ते कसूचे चैन पडूं देतात! माझा धंदा अगदीं चालेनासा झाला, व शेवटीं असें झालें कीं, दोन प्रहरची देखील भ्रांत येऊन पडली! पण मागें सांगितल्याप्रमाणें माझा निश्चय पक्का झाला असल्यामुळें, आजच्यापेक्षां उद्यांचा दिवस बरा येईल, अशी दैवाची परीक्षा पहात मी तीन वर्षें राहिलों; पण कांहीं नाहीं! ‘ आपण चिंतावें एक, आणि दैव चिंतितें एक ’ ह्या म्हणीची मला ह्या वेळीं पूर्ण प्रतीति आली. तेव्हां निरुपाय होऊन कप्तान विल्यम प्रिचर्ड नामक गृहस्थाचें गलबत हिंदमहासागरास जात होतें त्यावर मीं जागा पत्करिली. आम्ही इ० स० १६९९ च्या मे महिन्याच्या चवथ्या तारखेस ब्रिस्टल येथें गलबतांत बसलों.

ह्या प्रवासांत प्रथमतः आमचे कांहीं दिवस सुखाचे गेले. पण पुढें लवकरच संकटें आम्हांस ग्रासण्यास तयार होतीं. एकाएकीं भयंकर तुफान होऊन आमचें गलबत वानडीमन्सलांड नामक बेटाच्या वायव्येकडे अफाट समुद्रांत जाऊन पडलें. खाण्या-

पिण्याची अव्यवस्था व जबर मेहनत यांमुळें खलाशांपैकीं बारा असामी तर पार झालेच, व बाकीचेही बहुतेक त्याच पंथास लागले होते. नोवेंबरच्या पांचव्या तारखेस म्हणजे तिकडे उन्हाळ्यास आरंभ होण्याचे सुमारास खलाशांना गलबतापासून सुमारें अर्ध कोशाच्या अंतरावर एक खडक दिसला. तिकडे हळूहळू गलबत नेण्याचा विचार होता, इतक्यांत वारा सों सों करीत जो सुटला, त्यासरसें गलबत त्याच खडकावर जाऊन आपटलें, आणि लागलेंच दुभंग झालें! मी व आणखी पांच असामी मिळून एक होडी समुद्रांत टाकून तींत बसून चालते झालों. आम्हीं सुमारें तीन चार कोस ती होडी चालविली. पण जहाज बुडावयास लागलें तेव्हां तें वांचेल या आशेनें आम्हीं पराकाष्ठेचे श्रम केले होते, व हल्लींचे आणखी श्रम, यामुळें आम्ही अगदीं थकून गेलों. आमच्यानें इकडच्या तिकडे हालचाल देखील करवेना. तेव्हां अर्थातच वायुमहाराजांची मर्जी फिरेल तिकडे जाण्यावांचून आम्हांस दुसरा इलाज नाहींसा झाला! नंतर सुमारें दोन घटकांच्या आंत उत्तरेकडून वाऱ्याची जी भरारी आली तिजमुळें होडी उपडी झाली. माझे पांचजण सोबती, तसेंच खडकावर गलबत आदळलें त्या वेळेस जे कांहीं तेथें होते, व कांहीं गलबतांत होते, त्या एकंदर मंडळीची काय व्यवस्था झाली तें माझ्यानें कांहीं सांगवत नाहीं; परंतु ते सर्व समुद्रांत बुडाले असावे असा माझा तर्क होतो. असो; होडी पालथी झाल्यावर मी पोहत पोहत चाललों. पण कोणीकडे असें पुसाल तर त्याचें मला कांहीं उत्तर देतां येणार नाहीं. कारण अमुक बाजूकडे लवकर ठाव लागेल अशा उद्देशानें ह्मणजे मी पोहत होतों असें नाहीं; कां कीं, मला त्या समुद्राची कांहीं माहिती नव्हती. तर फक्त वाऱ्याच्या व लाटांच्या झोंकानें कोणीकडे तरी वाहातच चाललों होतों, असें

ह्मटल्यास चिंता नाहीं. पुष्कळ वेळां मीं पाय खालीं सोडून पाहिले, परंतु ठाव कांहीं लागेना. शेवटीं मी अगदीं थकून आतां बुडणार तों माझ्या पायांस जमीन लागली, व ह्या वेळेस वाराही पडला होता. मी हलके हलके कांहीं वेळ चाललों तों पुढें किनारा सांपडला. ह्या वेळीं सुमारें चार घटका रात्र झाली असावी.

मी किनाऱ्यावर अर्धा अगर पाऊण कोसपर्यंत चालत गेलों, परंतु मला तेथें वस्ती वगैरेचें कांहीं चिन्ह त्या वेळेस दिसलें नाहीं. मी अगदीं दमून गेलों होतों, व तेथील हवाही उष्ण होती, खेरीज जहाज सोडून निघण्याचे वेळीं मी थोडीशी दारू प्यालों होतों तिचा किंचित् अंमल आला होता, या सर्व कारणांनीं मला झोंपेची गुंगी आली. तेथें गवत उगवलेलें होतें तें आंखूड, मऊ, व दाट असल्याकारणानें त्यावर मला अशी नामी झोंप आली कीं, तशी जन्मांत कधीं आलेली मला आठवत नाहीं. मी सुमारें नऊ तासांनंतर जागा झालों; तों दिवस चांगला वर आला होता. तेव्हां मी उठावयास लागलों तों मला उठतां येईना. मी रात्रीं उताणा निजलों तो जागा होईतोंपर्यंत तसाच होतों; व आतां कुशीस वळून उठणार तों माझे हातपाय, तसेच डोकीचे दाट व सडक केंस जमिनीस [illegible] ! [illegible] छातीपासून पायांपर्यंतही सुतळीप्रमाणें बारीकशा दोरानें मला जमिनीशीं अगदीं खिळून टाकलें होतें. फक्त मला वर मात्र पहातां येत असे. पुढें बराच दिवस आल्यावर उन्हाच्या योगानें माझे डोळे दिपूं लागले. मला सभोंवतीं गुणगुणण्यासारखा कांहीं आवाज ऐकूं येत असे; पण मला इकडचें तिकडे वळतां न आल्याकारणानें वर आकाश मात्र तेवढें दिसे. पुढें थोड्या वेळानें माझ्या डाव्या पायाच्या मांडीवर कोणी जिवंत प्राणी चालत आहे असें मला वाटलें,

व तो हळू हळू येतां येतां माझ्या छातीवर येऊन पुढें ओठापर्यंत आला. मला किंचित् मान वर करवली तेवढी करून तें काय आहे ह्मणून पाहूं लागलों तों तो प्राणी मनुष्यच ! त्याची उंची सहा इंचांहून अधिक नसून त्याच्या पाठीवर बाणांचा भाता व हातांत तीरकमठा होता. इतक्यांत त्या मनुष्याच्या पाठीमागून त्याच्याचसारखीं आणखी सुमारें चाळीस मनुष्यें येत आहेतसें मला भासलें. या गोष्टीचें मला पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें; व मी इतका मोठ्यानें ओरडलों कीं, ते सर्व भिऊन सैरावैरा धांवूं लागले; व पुढें मला ह्या लोकांची सर्व हकीकत कळल्यावर असें समजण्यांत आलें कीं, त्यांनीं ह्या वेळेस भिऊन माझ्या अंगावरून उड्या टाकिल्या तेव्हां कित्येकांचीं अंगें इतकीं दुखावलीं कीं, ते पुष्कळ दिवस पुढें आजारी पडले ! असो; पण ते लवकरच परत आले, व त्यांपैकीं एकजण, मी त्याच्या चांगला दृष्टीस पडेन असा अगदीं माझ्याजवळ आला, व मोठ्या आश्चर्यानें हात वर करून व डोळे वटारून 'हेकिना डेगुल्' असें ह्मणाला. बाकीच्या लोकांनींही तोच शब्द मोठ्यानें पुनः पुनः उच्चारिला. पण ह्याचा अर्थ मला कांहीं देखील समजला नाहीं. ह्या सर्व वेळ मी मोठ्या काळजींत पूर्वीप्रमाणेंच जमिनीवर पडलों होतों. शेवटीं मी मोकळा होण्याकरितां धडपडावयास लागलों असतां सुदैवानें ज्या दोऱ्यांनीं माझा डावा हात त्यांनीं बांधिला होता त्या तुटल्या; तसेंच त्या दोऱ्या ज्या खुंट्यांस बांधिल्या होत्या त्या खुंट्याही उपटल्या. तेव्हां तो हात वर करतांच मला कोणत्या रीतीनें बांधिलें होतें तें मला कळलें. मग आणखी पुष्कळ जोर केल्यावर माझे डावे बाजूचे केंस ज्या दोऱ्यांनीं बांधिले होते त्या अंमळ ढिल्या झाल्या, तेव्हां मला कांहींसें डोकें वर करतां येऊं लागलें. त्या लोकांस मी धरणार तों ते बरेच दूर पळून गेले, व त्यांनीं ओरडून मोठा गोंधळ

केला. नंतर एकजण ' टोल्गो फोनॅक ' असें मोठ्यानें बोलला. त्यावरून ते सर्व माझ्या डाव्या हातावर बाणांचा वर्षाव करता-तसें वाटलें. ते त्यांचे बाण सुयांप्रमाणें मला टोचूं लागले. खेरीज त्यांपैकीं कित्येकांनीं कुलपीं गोळ्यांप्रमाणें गोळ्यांचा वर्षाव केला; त्या बारीक वाळूच्या कणांप्रमाणें लागत. हा मारा संपल्यावर मी पुनः सुटण्याकरितां जोर करूं लागलों, तों त्यांनीं पूर्वीच्याहून अधिक जोरानें गोळे मारण्याचा सपाटा चालविला, व कित्येकजण माझे अंगास भाले टोचूं लागले. परंतु सुदैवानें माझ्या अंगांत चामड्याची बंडी असल्याकारणानें माझ्या अंगास त्यांचे ते भाले टोंचत नसत. अशा स्थितींत तूर्त आपण स्वस्थ पडून राहून रात्र झाली ह्मणजे खुशाल सुटून जावें ह्मणजे झालें, असें मला वाटलें. वास्तविक ह्मटलें तर सुटून जाण्यास ह्मणजे मला मोठीशी पंचाईत होती असें नाहीं; कारण एक तर माझा डावा हात पूर्वीच मोकळा झाला होता, व दुसरें, त्या लोकांची भीतिही बाळगण्याचें कारण नव्हतें; कां तर मला वाटलें कीं, ते सर्वच जर मी पूर्वीं पाहिल्याप्रमाणें एकाच आकाराचे असले, तर त्यांचें मोठें प्रचंड सैन्य जरी आलें, तरी त्या सर्वांसही हात दाखविण्यापुरती आपल्या अंगीं शक्ति आहे. पण वर लिहिल्याप्रमाणें करण्याची मला जरूरच पडली नाहीं; कारण मी स्वस्थ पडलों हें पाहून त्या लोकांनीं तीर वगैरे मारण्याचें बंद केलें. परंतु जो कांहीं त्यांचा आवाज ऐकूं येत होता, त्यावरून त्यांची संख्या मात्र आणखी वाढली असावी असें मला वाटलें. माझ्या उजव्या कानाकडे सुमारें चार यार्डांच्या अंतरावर एक तास दीडतास कांहीं खुटखुट असा आवाज होत होता. तो, ज्याप्रमाणें कांहीं लोक एकत्र जमून कामबिम करीत असले ह्मणजे होतो, तसा मला भासला. तेव्हां माझ्यानें जितकें त्या बाजूकडे डोकें वळवलें, तितकें मीं वळवून पाहिलें तों सुमारें

दीड फूट उंचीचा एक ओटा तयार केलेला माझ्या दृष्टीस प-डला. त्यावर त्या लोकांपैकीं चारजण उभे राहतील इतका तो मोठा होता, व त्यास दोन तीन शिड्या लावल्या होत्या. त्या ओट्यावर उभें राहून त्यांपैकीं एकजणानें बरेंच लांबलचक भाषण केलें; पण त्यांपैकीं मला एक अक्षरही समजलें नाहीं. हा भाषण करणारा त्यांच्यापैकीं कोणी बडा मनुष्य असावा असें त्याच्या डौलावरून दिसत होतें. हो, पण एक सांगण्याचें विसरलों कीं, बोलावयास लागण्याचे पूर्वी तो तीन वेळ 'लँ-ग्रो डेहुल् सॅन्' असें मोठ्यानें ओरडला. ह्या व पूर्वींच्या श-ब्दांचा अर्थ मग मला पुढें त्या लोकांकडून कळला. असो; तो वर लिहिल्याप्रमाणें ओरडून बोलतांच सुमारें पन्नास लोक ये-ऊन त्यांनीं, माझ्या डोक्याची डावी बाजू ज्या दोऱ्यांनीं खुंट्यांस बांधलेली होती, त्या दोऱ्या तटातट तोडून टाकिल्या. त्यामुळें मला उजवे बाजूकडे डोकें करतां येऊन त्या वक्त्याचें तोंड व हावभाव माझ्या नजरेस पडूं लागले. त्याची उमर अर्धी होऊन गेलेली असून त्याजबरोबर असणाऱ्या तिघांपेक्षां तो उंच असा दिसत होता. त्या तिघांपैकीं एक जासूद असून तो माझ्या मधल्या बोटापेक्षां किंचित् मोठा दिसत होता. बाकीचे दोघं त्या वक्तयाच्या दोहों बाजूंकडे भालदारचोपदारांप्रमाणें उभे होते. वक्त्याच्या अंगीं जेवढे ह्मणून गुण असतात, तेवढे सर्व त्यानें आपल्याकडून दर्शविण्याचा प्रयत्न केला. त्याच्या हाताच्या खुणांवरून तो मला कांहीं भीति घालीत आहे, तसेंच मजवर दयाही पण करण्याचा त्याचा विचार असावा, असें मला वाटलें. मीं त्यास थोडक्यांत व अति लीनपणनें उत्तर दिलें, व आपलें डोकें व डावा हात वर करून, मी जर बेइमानी होईन तर मला 'सूर्यनारायणाची शपथ' असें त्यास दर्शविलें. आतां जहाज सोडल्याच्या पूर्वींही कांहीं वेळापासून माझ्या पोटांत

एक घांसभर देखील अन्न न गेल्यामुळें भुकेनें माझे प्राण व्याकुळ होत होते; यामुळें तोंडास वारंवार हात लावून, खाण्याकरितां मी अति उतावीळ झालों आहें असें त्यास दर्शविल्यावांचून मला राहवेना. त्या हर्गोनें [ म्हणजे उमरावानें असें मला पुढें कळलें] माझें मनोगत पूर्णपणें जाणलें. तो ओटयावरून खालीं उतरला, आणि त्यानें माझ्या अगास कित्येक शिडया लावण्याविषयीं हुकूम फर्माविला. त्या शिडयांवर सुमारें शंभर असामी चढले, आणि अन्नानें भरलेलीं ताटें घेऊन माझ्या तोंडाकडे आले. हें अन्न, तेथील बादशाहास मीं आल्याची खबर कळल्यावरून त्याच्या हुकुमानें आलें होतें. त्यांत त्या देशाच्या चालीचे अनेक पदार्थ होते; पण त्यांपैकीं कढी, भात, पोळ्या वगैरे पदार्थांखेरीज पुष्कळांचीं नांवेंही मला माहीत नव्हतीं. तोंडांत जें जें ह्मणून ते टाकीत त्यांची मी तेव्हांच चटणी करून टाकीं—अशी कीं, ते इतके पुष्कळजण असतांही त्यांची अगदीं त्रेधा उडून गेली ! तरी कंटाळा न करतां त्यांजकडून जितकी त्वरा झाली तितक्या त्वरेनें त्यांनीं पदार्थ आणून मला ढेंकर येईतोंपर्यंत खाऊं घातलें. ह्याप्रमाणें भोजनविधि आटपल्यावर मीं पाणी पाहिजे म्हणून खूण केली. माझ्या जेवणावरून त्यांनीं अजमास केला कीं, याला पाणीही त्याच बेतानें लागेल. तेव्हां त्यांनीं एक पीपचें पीपच माझ्या तोंडास आणून लाविलें. त्याचा मीं एका घोटासरसा फडशा पाडला, कारण त्यांत पुरतें एक पंचपात्रीभर देखील पाणी नव्हतें ! तें पाणी फार मधुर होतें. त्यांनीं आणखी एक पीप भरून मजकडे आणिलें. तेंही मीं पूर्ववत् गट्ट करून टाकिलें, व आणखी पाहिजे ह्मणून खूण केली. परंतु ते देतात कोठून ? त्यांजपाशीं डोळ्यास लावण्यासही थेंब उरला नव्हता ! त्यांनीं येवढा अट्टाहास करून सर्वांनीं मिळून इतकें अन्न व पाणी आणिलें, तें

सगळें मीं खपविलें, हें पाहून त्यांस ' न भूतो न भविष्यति' असा अद्‌भुत चमत्कार वाटलासें दिसलें; व आपण स्वतःही मोठा पराक्रम [मला अन्न पाणी वगैरे पुरविण्याचा] केला ह्मणून त्यांनीं आनंदाच्या आरोळ्या मारल्या. ते माझ्या उरावर पुष्कळ नाचले, व पूर्वीप्रमाणें 'हेकिना डेगुल्' असा शेंकडों वेळां त्यांनीं शब्द केला. मग वर आणिलेलीं दोन्ही पिपें खालीं टाकण्याविषयीं त्यांनीं मला खूण केली, परंतु त्याचे अगोदर त्यांनीं खालीं असलेल्या सर्व लोकांस दूर होण्याविषयीं ताकीद केली; कारण कदाचित् पिपांखालीं सांपडल्यास दहावीसजण चिरडून जाया व्हावयाचे! तीं दोन्ही पिपें मीं खालीं टाकण्याकरितां फेंकून दिलीं हें पाहून त्यांनीं एकच आरडाओरड केली; व तीवर आलेली मंडळी माझ्या उरावर धांगडधिंगा करतांना पाहून माझ्या मनांत आलें कीं, त्यांत जे कांहीं चाळीस पन्नास आपल्या हाताच्या तडाक्यांत येतील त्यांस धरून एकदम जमिनीवर आपटावें. परंतु मीं मनांत विचार केला कीं, आपण पूर्वीपासून आपल्या लीनपणाच्या वर्तनानें यांची खात्री केली आहे कीं, आपल्या हातून यांस कोणत्याही प्रकारें उपद्रव होणार नाहीं; खेरीज हेंही माझ्या मनांत आलें कीं, त्यांनीं जरी कांहीं केलें तरी त्यांचे हातून आपल्या केंसासही धक्का म्हणून पोहोंचण्याचा संभव नाहीं; तेव्हां विनाकारण आपणास असें करणें अनुचित होय. शिवाय दुसरें असें मला वाटलें कीं, त्यांनीं जो आपला येवढा पाहुणचार केला, त्याचें त्यांस अशा रीतीनें बक्षीस देणें ह्मणजे केवळ अधमपणाच होय! पण ह्या छोटेखानी माणसांच्या धीटपणाविषयीं मला राहून राहून पराकाष्ठेचें आश्चर्य वाटे कीं, जो मी त्यांस केवळ पर्वतप्राय राक्षसच भासलों असेन, त्या माझ्या शरिरावर ते खुशालपणें मनांत भयाचा लेशही न धरितां चढले व हवे तसे खिदळले! असो; यानंतर तेथल्या बादशाहा-

कडून मजकडे एक मुत्सद्दी आला. त्याजबरोबर त्याच्या तैनातींतील दहाबारा माणसें होतीं. त्यांसह तो माझ्या उजव्या पायावर चढून नंतर अगदीं वर माझ्या तोंडाशीं आला, व बादशाही शिक्कामोर्तबासह आणिलेलं आज्ञापत्र माझ्या डोळ्यांसमोर धरून सुमारें पावघटका त्यानें भाषण केलें. त्यांत रागाचीं वगैरे कांहीं चिन्हें दिसत नव्हतीं. पण कांहीं एक प्रकारचा मजविषयीं त्या लोकांचा निश्चयात्मक बेत झाला असावा असें दिसलें. त्यानें बोलतांना वारंवार आपल्या समोरच्या बाजूकडे हात केले; व पुढें झालेल्या कृतीवरून मग माझ्या ध्यानांत आलें कीं, हे जे त्यानें हात केले, तिकडे सुमारें अर्ध्या मैलावर त्या बादशाहाची राजधानी असून मला तेथें नेण्याविषयीं त्यानें आपल्या मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें ठराव केला होता. असो; ह्या मुत्सद्याचें बोलणें संपल्यावर त्याला मीं उत्तरादाखल कांहीं शब्द बोललों, पण ते अर्थातच त्यास समजले नाहींत. मीं बोलतांना आपला मोकळा हात दुसऱ्या हातावर ठेवून तो त्या मुत्सद्याच्या डोक्यावर येईल असा धरिला; व त्यांत असें दर्शविलें कीं, मजपासून तुह्मांस अगर तुमचे लोकांस यत्किंचित् तोशीस पोंचणार नाहीं. नंतर मीं आपल्या डोक्याकडे आणि अंगाकडे बोट करून असें दर्शविलें कीं, मला बंधमुक्त करावें. माझा उद्देश त्यानें जाणलासें दिसलें, कारण त्यानें आपलें डोकें हालवून माझें म्हणणें मंजूर होणार नाहीं असें दर्शविलें, व मला बंदीवान करून न्यावयाचें आहे असें त्याच्या हस्तव्यापारांवरून दिसून आलें. तथापि त्यानें दुसऱ्या ज्या कांहीं खुणा केल्या त्यांवरून समजलें कीं, त्यांजकडून मला [illegible] यथास्थित मिळून चांगल्या रीतीनें मला वागविण्याचा त्यांचा बेत असावा. हें झाल्यावर पुनः आणखी एकदां आपले बंद तोडण्याचा विचार माझ्या मनांत आला. परंतु जेव्हां पुनः त्यांचे

तीर माझ्या तोंडावर व हातांवर येऊं लागले, व माझ्या हातांस जिकडे तिकडे फोड आले होते त्यांतही ते कित्येक जाऊन रुतूं लागले, आणि माझ्या शत्रूंचा जमावही अधिक अधिक होत चाललासें जेव्हां मला दिसलें, तेव्हां मीं त्यांस खुणांनीं कळविलें कीं, तुह्मांस जें काय वाटेल तें माझें करा. त्यावरून तो हर्गो आणि त्याच्या बरोबरचे लोक हर्षभरित होऊन मोठ्या सभ्य रीतीनें चालते झाले.

मला असें वाटतें कीं, मी ह्या किनाऱ्यावर आल्यानंतर जमिनीवर झोंपीं गेलेला असा प्रथमतः तेथील कोणा हेराच्या दृष्टीस पडल्यावरून त्यानें मजविषयीं बादशाहास बातमी दिली असावी; नंतर त्यानें आपल्या प्रधानमंडळाच्या सल्लामसलतीनें मागें लिहिल्याप्रमाणें मला बांधण्याचा ठराव करून व माझ्या पोटापाण्याची व्यवस्था करण्याविषयीं तजवीज करून, मला राजधानीस नेण्याकरितां एक यंत्र तयार करण्याचा हुकूम केला असावा.

ही बादशाहाची वर सांगितलेली कृति अतिशय धीटपणाची व जिवावरची होती असें कदाचित् कोणी ह्मणेल; व मलाही खास वाटतें कीं, असल्या प्रसंगी युरोपियन राजांपैकीं कोणीही अशा प्रकारचें वर्तन करणार नाहीं. तथापि माझ्या मतें बादशाहाचें तें करणें फार शहाणपणाचें व दिलदारीचें होतें. कारण अशी जरी कल्पना केली कीं, प्रथमच ह्या लोकांनीं मला निजलेला पाहून बाणांनीं व भाल्यांनीं मला ठार मारण्याचा प्रयत्न केला असता, तर माझ्या अंगास कांहीं बोचलेंसें वाटतांच मी जागा होऊन माझा राग व शक्ति यांनीं एकदम उचल केली असती; व ज्या सपाट्यांत, मला ज्या दोऱ्यांनीं बांधिलें होतें त्या मीं तोडून टाकल्या असत्या, आणि असें झालें असतें ह्मणजे पुढें कसलाही अडथळा त्यांच्यानें मला न

करवता, व मजकडून त्यांजवर मग दया होण्याचाही बिलकूल संभव नव्हता.

हे लोक गणितविद्येंत फार प्रवीण असून यंत्रविद्येच्या तर केवळ शिखरास जाऊन पोहोंचले आहेत. त्यांचा बादशाहा विद्येचा मोठा पुरस्कर्ता असा त्याचा लौकिक असून त्याच्याच आश्रयानें व उत्तेजनानें वरील विद्येंत ते लोक इतके पारंगत झाले आहेत. झाडें व दुसरे जड पदार्थ वाहून नेण्याकरितां ह्या बादशाहाजवळ चाकांवर बसविलेलीं अशी पुष्कळ यंत्रें आहेत. त्याच्या राज्यांतील अतिशय मोठीं जहाजें म्हटलीं म्हणजे आठ नऊ फूट लांबीचीं असतात, व तीं ज्या लांकडाचीं करितात तें लांकूड जेथें होतें त्याच ठिकाणीं तीं तयार करून मागें सांगितलेल्या यंत्रांनीं समुद्रावर नेतात. असो; वरीलप्रमाणें एक मोठें थोरलें यंत्र तयार करण्याकरितां बादशाहाचे हुकुमावरून पांचशें सुतार व पांचशें इंजनेर एकदम लागले. हें यंत्र लांकडी असून तीन इंच उंचीचें होतें. त्यास बावीस चाकें होतीं, व त्याची लांबी सात व रुंदी चार फूट होती. हें यंत्र मजकडे आलें तेव्हां आरोळ्यांचा खूब मोठा गजर झाला. मी जसा आडवा पडलों होतों त्याप्रमाणें तें यंत्र माझ्याशीं अगदीं समांतर असें ठेविलें. आतां मला उचलून ह्या खटाऱ्यावर कसें ठेवावें ही मोठी अडचण येऊन पडली. ह्याकरितां एक एक फूट उंचीच्या एशीं काठ्या उभ्या केल्या, आणि माझ्या मानेला, हातापायांना व अंगाला जे पूर्वीं कित्येक पट्टे बांधिले होते त्यांना आंकडे अडकवून त्यांस मुनस्फप्रमाणें बळकट अशा दोऱ्या बांधिल्या, व वरील काठ्यांस कित्येक कप्या लावून त्यांवरून दोऱ्यांनीं ओढून मला त्या खटाऱ्यावर ( ह्म० गाडींतच कां ह्मणाना ) घालण्याची युक्ति त्यांनीं बसविली. त्या कामास त्या लोकांपैकीं नऊशें अतिशय बळकट असामी लागले, व त्यांनीं एका प्रह-

ाचे आंत मला गाडींत घालून तेथें करकावून आवळून टाकिलें
ें झालेलें सर्व वर्तमान पुढें मला त्या लोकांच्या तोंडून कळलें
कारण मला जें पाणी प्यावयास दिलें ह्मणून मीं पूर्वी सांगितलें
त्यांत कांहीं बेशुद्ध होण्याचें औषध घातलें होतें; त्यामुळें वरील
कृत्य होण्यापूर्वी मला डोळा लागतोसें वाटून जो मी बेशुद्ध
झालों तों पुढें काय काय झालें याचें मला बिलकूल स्मरण
नव्हतें. बादशाहाच्या पागेपैकीं निवडक एक जात दीडहजार
घोडा मला राजधानीस नेण्याकरितां लाविला होता. त्या घोड्यांची
उंची सुमारे साडेचार इंच होती. सदहू ठिकाणापासून राजधानी
अर्धा मैल दूर होती हें मीं पूर्वीं सांगितलेंच आहे.

वर [illegible] णें थाटानें आमची स्वारी निघाल्यावर चार
तासांनीं मी त्या लोकांच्या कांहीं चावटपणाच्या कृत्यानें जागा
झालों. तें असें. गाडी चालत असतां मध्येंच तिचें कायसें
मोडलें. तें नीट करीत असतां जेव्हां गाडी थांबली, तेव्हां त्या
लोकांपैकीं दोन तीन उमेदवार मंडळींस मी झोंपीं गेलों असतां
कसा दिसतों हें पाहण्याची इच्छा झाली. तेव्हां ते गाडीस
लोंबकळून वर चढले आणि हळूच माझ्या तोंडाकडे चालत
आले. त्यांपैकीं एकजण हवालदार होता. त्यानें आपल्या संगि-
नीचें टोंक माझ्या डाव्या नाकपुडींत बरेंच लांब घातलें. त्याच्या
योगानें नाकांत एकादी काडी घातल्याप्रमाणें गुदगुल्या होऊन
मला सडकून एक मोठी शिंक आली. तेव्हां ते लोक हळूच
गुपचुप निघून गेले. हें एकाएकीं जागें होण्याचें कारण
मला पुढें तीन वारांनंतर कळलें. असो, पुढें संध्याकाळप-
र्यंत गाडी सपाट्यानें चालली. रात्रीं मी निजलों त्या वेळेस
माझ्या भोंवतीं चौफेर पांचशें लोकांचा खडा पाहरा होता.
यांत निमेध्या हातांतून मशाली असून बाकीच्यांच्या हातांत
तीरकमठे अगदीं सज्ज केलेले होते; अशाकरितां कीं, कदा-

चितू माझें कांहीं हालचालीचें चिन्ह दिसल्यास एकदम बाणांचा वर्षाव करण्यास सांपडावा. दुसरे दिवशीं सूर्योदय होतांच आमचें कूच पुनः सुरू झालें; व दोन प्रहर दिवसाचे सुमारास



"त्यानें आपल्या संगिनीचें टोंक माझ्या नाकपुडींत... घातलें." (पृष्ठ १८.)

आह्मी शहरचे वेशीपासून दोनशें यार्डांच्या अंतरावर आलों. त्या वेळां बादशाहा आपल्या सर्व दरबारी लोकांसह आह्मांस सामोरा आला. त्या दरबारी मंडळींपैकीं मुख्य मुख्य जे

होते त्यांनीं बादशाहानें आग्रहपूर्वक सांगितलें कीं, खासा स्वारींनीं ह्या पर्वतप्राय मनुष्याच्या शरिरावर चढून आपला जीव धोक्यांत घालून घेऊं नये.

ज्या ठिकाणी गाडी उभी राहिली तेथें राज्यांतलें अतिशय मोठें व प्रख्यात असें एक देऊळ होतें. त्या देवळांत पूर्वी एक घोर हत्या घडली होती, यास्तव तें स्थळ अपवित्र असें मानून तेथील सर्व दागदागिने व सामानसुमान काढून नेलें होतें. तेव्हां ती जागा आयतीच रिकामी पडली होती, तेथें मला ठेवण्याचा त्यांनीं ठराव केला. त्या देवळाचें दार पूर्वाभिमुख असून त्याची उंची चार फूट व रुंदी दोन फूट होती, व त्यांतून मला रांगत रांगत सहज आंत जातां येत असे. त्या दाराच्या चोहों बाजूंस चार लहान लहान खिडक्या असून त्यांची उंची सहा इंचांहून अधिक नव्हती. या खिडक्यांपैकी डाव्या बाजूच्या खिडकींतून राजवाड्यांतील एका लोहारानें ९१ बिड्या आणिल्या, व त्या माझ्या डाव्या पायांत घातल्या. त्यांस ३६ कुलुपें लागलीं. ह्या बिड्या, युरोपांतील बायकांच्या खिशांतल्या घड्याळांस ज्या सांखळ्या असतात, तसल्या व तितक्याच मोठ्या होत्या. देवळाच्या समोरच्या बाजूस वीस फुटांच्या अंतरावर एक मोठा रस्ता वहात होता. त्या रस्त्याच्या दुसऱ्या बाजूकडे एक पांच फूट उंचीचा ओटा होता. त्या ओट्यावर बादशाहा व त्याचे मुख्य अमीरउमराव हे उभे राहून मला पहात असत. ही गोष्ट तरी मला मागाहून कळली. कारण मला माझ्या जागेवरून ते कधींही दिसले नाहींत. खेरीज मी आल्याची बातमी चोहोंकडे पसरतांच शहरवासी लोकांची मला पहाण्यासाठीं मोठीच गर्दी जमली, व भोंवतालचे पहारेकरी जरी मनाई करीत होते, तरी कित्येक वेळां दहा हजारपर्यंत लोक शिड्या लावून माझ्या अंगावर चढत असत. परंतु अशा प्रकारें

इतःपर कोणीहीं माझ्या अंगावर चढूं नये, चढल्यास त्यास एकदम फांशीची शिक्षा होईल, असा एक जाहिरनामा लागलाच प्रसिद्ध झाला. असो, मागें सांगितल्याप्रमाणें बिड्या वगैरे घातल्यानें माझा पक्का बंदोबस्त झाला, व मला आतां सुटून जाण्यास बिलकूल सवड राहिली नाहीं, असें त्या लोकांस वाटल्यावरून त्यांनीं मला ज्या दोऱ्यांनीं बांधिलें होतें त्या दोऱ्या तोडून टाकिल्या. तेव्हां मी उठून उभा राहिलों. त्या वेळीं माझ्या मनाची जी उदासीन स्थिति झाली तशी पूर्वीं कधींही झाली नव्हती. मी उभा राहून जेव्हां चालूं लागलों तेव्हां त्या लोकांस जे आश्चर्य वाटलें, व त्यांनी जो एकच गोंगाट केला, त्याचें मला वर्णन सुद्धां करितां येत नाहीं ! माझ्या डाव्या पायास जे सांखळदंड बांधिले होते ते सुमारें दोन यार्ड लांबीचे होते, त्यामुळें मला मागें पुढें पाय करण्यास सांपडत असत, व देवळाच्या दारापासून चार इंचांच्या अंतरावर मला बांधून ठेवीत असत, यामुळें तेथून देवळांत रांगत रांगत जाऊन मला हवें तसें हातपाय पसरून निजावयास सांपडे.

---

## प्रकरण २.

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें मी उठून चालावयास लागलों तेव्हां सभोंवतीं जी वनश्री नजरेस पडली ती खरोखरच अपूर्व होती. सर्व देश जसा काय एक मोठी बागच लागून गेली आहे कीं काय असा भासे. शेतांचीं क्षेत्रफळें १९० पासून १६० चौरस फूट असून त्यांच्या सभोंवतीं हिरव्या गार शेरताट्या होत्या. तीं शेतें दुरून फुलझाडांच्या [illegible] भासत. त्यांच्या मधून पांचपांच सहासहा फूट उंचीचीं झाडें होतीं. सात फूट म्हणजे तेथील झाडांच्या उंचीची शिकस्त झाली असें माझें अनुमान आहे. मीं एकंदर सर्व शहराची रचना

पाहिली, तेव्हां तें रंगभूमीवर कृत्रिम रीतीनें तयार केलेल्या एकाद्या सुंदर नगरीप्रमाणें दिसलें.

वर लिहिल्याप्रमाणें मी तो रमणीय प्रदेश अवलोकन करीत होतों, इतक्यांत बादशाहाची स्वारी किल्ल्यावरून उतरून अश्वारोहण करून मला पाहण्यास आली. या वेळीं बादशाहावर एक मोठें संकट येऊन गुजरलें. तें असें कीं, त्याचा घोडा एकाएकीं बिथरून मोठ्यानें खिंकाळूं लागला, व मागील दोन पायांवर ताठ उभा राहिला ! याचें कारण असें दिसतें कीं, तो जरी फार उत्कृष्ट रीतीनें तयार केलेला होता, तरी मला चालतांना पाहून हा काय आपणापुढें एकादा पर्वतच चालला आहे असें त्यास वाटून तो बुजला असावा. परंतु बादशाहा हा घोड्यावर बसण्याचे कामांत इतका पटाईत होता कीं, चाकरमाणसें धांवून येऊन ते घोड्याचा लगाम धरीत तोंपर्यंत त्याचें अंग तिळभरही चळलें नाहीं ! असो; सरकारस्वारी घोड्यावरून खालीं उतरली व मजकडे मोठ्या आश्चर्यानें पाहूं लागली; परंतु माझ्याजवळ न येतां सुमारें तीन यार्डांच्या अंतरावर राहिली. वांकनिसास पूर्वीं हुकूम झालाच होता, त्याप्रमाणें माझ्या भोजनाकरितां अन्नपाण्याची सिद्धता होऊन आचारीपाणक्यांनीं तें गाड्यांवर घालून त्या लोटीत लोटीत मजकडे आणिल्या. एकंदर तीस गाड्या आल्या, त्यांपैकीं वीस अन्नानें भरलेल्या असून दहांत कालवणपाणी वगैरे होतें. दरएक गाडींतील अन्न माझ्या दोन तीन घांसांपुरतें होतें. पाणी लहान लहान मातीच्या भांड्यांत आणिलें होतें, तें मीं सर्व एका पिपांत ओतून एका घोटासरसें पार केलें. राणी, राजपुत्र व राजकन्या, आणि दुसऱ्या कित्येक सभ्य गृहस्थांच्या स्त्रिया ह्या कांहीं अंतरावर खुर्च्यांवरून बसल्या होत्या; परंतु बादशाहाचा

घोडा पूर्वी बिथरला होता तेव्हां तीही मंडळी बादशाहा उतरतांच खुर्च्यांवरून उठून त्याजपाशीं येऊन बसली. बादशाहा दरबारांतील सर्व लोकांहून अजमासें एक गहूंभर उंच होता; व त्यामुळें त्यास पाहिल्याबरोबरच ... असें वाटे कीं, ह्या पुरुषाच्या अंगीं कांहीं अमानुष शक्ति असावी. त्याची आंगकाठी बळकट असून तो केवळ पौरुषाची मूर्तिच आहे असें वाटे. त्याचें नाक कमानदार व रंग निमगोरा होता. अंग सडपातळ व शरीरावयव जेथल्या तेथें रेंखलेले आणि तेजस्वी असे असून त्याची चालचलणूक फारच सभ्यपणाची होती. त्या वेळीं तो अठ्ठावीस वर्षांचा असून त्याचा ज्वानीचा भर कमी झाला होता. त्यास राज्यावर बसून सात वर्षें झालीं होतीं, व त्याचा हा सर्व काळ अतिशय सुखांत आणि भरभराटींत गेला होता. बादशाहा माझ्या दृष्टीस नीट व सहज रीतीनें पडावा याकरितां मी त्याच्या समोर तोंड करून आडवा समांतर पडलों. खेरीज पुढें मीं त्याला पुष्कळ वेळां आपल्या हातांतही धरिलेलें आहे. यास्तव जें मीं त्याजविषयीं वर्णन दिलें आहे, त्यांत तफावत असण्याचा बिलकूल संभव नाहीं. त्याचा पोषाक साधा असून कांहींसा युरोपियन तऱ्हेचा व कांहींसा एशियाटिक तऱ्हेचा होता; परंतु त्याच्या मस्तकावर एक सोन्याचें हलकेंसें शिरस्त्राण होतें. तें रत्नखचित असून त्याला वर एक तुरा खोंविलेला होता. त्यानें आपल्या हातांत नागवी तरवार ठेविली होती; अशाकरितां कीं, मी कदाचित् आपल्या बिडया तोडून मोकळा सुटलों तर प्रसंगीं ती स्वसंरक्षणास उपयोगीं पडावी. ती सुमारें तीन इंच लांबीची होती. तिची मूठ व म्यान हीं सोन्याचीं होतीं, व त्यांस हिरे जडविलेले होते. बादशाहाचें बोलणें किंचित् कर्कश पण इतकें स्पष्ट होतें कीं, मी उभा असतांही तें मला चांगलें

ऐकूं येई. त्याच्याबरोबर आलेली दरबारची मंडळी उंची पोषाक करून आली होती. तेणेंकरून तें स्थळ एकाद्या भरजरी शेल्याप्रमाणें दिसे. सरकारस्वारीनें मला अनेक प्रश्न केले, व मींही त्यांस उत्तरें दिलीं, परंतु [illegible] एकमेकांच्या बोलण्यांतील चकार शब्द देखील कळला नाहीं. त्या ठिकाणीं राजोपाध्याय व राजदरबारी वकील हेही आले होते. त्यांनींही राजाज्ञेवरून मला कांहीं पुसलें. मला डच, ल्याटिन, इटालियन, फ्रेंच, स्पॅनिश वगैरे भाषा [illegible] समजत होत्या, त्यांत मी त्यांशीं बोलूं लागलों; परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. नंतर सुमारें अर्धे घटकेनें कचेरी बरखास्त झाली, व माझ्या सभोंवतीं कडेकोट बंदोबस्ताचा पहारा ठेवण्यांत आला; कारण तेथें बदमाष लोक अतिशय जमले होते ते माझ्या अगदीं जवळ येण्यास पहात होते; सबब कदाचित् रिकामा चावटपणा करून ते मला उपद्रव करतील तर बंदोबस्त केलेला असला म्हणजे बरें असें त्यांस वाटलें असावें. ह्या गोष्टीची प्रतीति येण्यास उशीर लागला नाहीं. मी आपल्या घराच्या ( म्हणजे मागें [illegible] [illegible] देवळाच्या ) दाराशीं बसलों असतां त्या चांडाळचौकडीनें मजवर तीर सोडण्यास आरंभ केला. एक तीर तर अगदीं माझ्या डाव्या डोळ्यासरसा गेला, व थोडें चुकलें, नाहीं तर त्या वेळेस माझा डोळाच फुटावयाचा ! परंतु पहारेकऱ्यांवरील नायकानें तें बंड तेव्हांच मोडलें. त्यानें तत्क्षणीं त्या पुढाऱ्यांपैकीं सहाजणांच्या मुसक्या बांधून त्यांस माझ्या स्वाधीन करण्याविषयीं हुकूम केला, व त्यांस हीच शिक्षा देणें त्याला पसंत वाटलें. कारण माझ्या स्वाधीन करणें म्हणजे केवळ मृत्यूच्याच तोंडांत टाकणें होय असें त्यास वाटलें असावें. असो; नायकाचा वर लिहिल्याप्रमाणें हुकूम होतांच त्या दंगेखोरांस शिपायांनीं चतुर्भुज करून आपल्या

भाल्याच्या दांडयानें ढोंशीत ढोंशीत माझ्यापुढें आणून सोडिलें. मीं त्यांस आपल्या उजव्या हातांत घेऊन त्यांपैकीं पांच जणांस आपल्या बंडीच्या खिशांत घातलें. सहाव्याची अशी गंमत केली कीं, त्यास आतां जणूं काय जिवंतच गट्ट करणार असें दाखविलें. तेव्हां त्या गरीब बिचाऱ्याची पांचांवर धारण बसली; व मीं आपला चाकू बाहेर काढिला तेव्हां तर नाईक आणि शिपाई हेही घाबरले. पण लवकरच मीं त्यांचें भय नाहींसें केलें. त्या मनुष्याकडे मीं हास्यमुद्रेनें पाहिलें, व त्यास ज्या दोऱ्यांनीं बांधिलें होतें त्या तोडून टाकून त्याला हलकेच जमिनीवर ठेविलें; तेव्हां तो पळून गेला. तद्वत्प्रमाणें मीं बाकीच्यांसही



"मी...चाकू बाहेर काढिला." (पृष्ठ २५.)

एकामागून एक सोडून दिलें. हा माझा दयाळूपणा पाहून शिपाई व नाईक यांस फारच आनंद झाला असें दिसलें; व ही गोष्ट, सरकारचा मजविषयीं बहुत प्रकारें चांगला ग्रह होण्यास कारणभूत झाली.

रात्र होतांच मी हळूहळू आपल्या घरांत जाऊन तेथें जमिनीवरच निजलों. मजकरितां एक बिछाना तयार करण्याविषयीं बादशाहाचा हुकूम झाला होता. पण तो तयार होऊन मला मिळण्यास पंधरा दिवस लागले. बिछान्याची व्यवस्था येणें-प्रमाणें लागली:—दीडशें बिछाने एकास एक शिवले तेव्हां लांबी-रुंदी पुरेशी झाली, व असे चार गदेले पुनः एकावर एक घालून शिवले तेव्हां माझी गादी तयार झाली. ह्याप्रमाणें त्यांचे सहाशें बिछाने नुसत्या माझ्या गादीकरितां लागले, तरी मला

राजधानीचा—किंबहुना सर्व राज्याचाही—फडशा उडावयाचा ! याप्रमाणें ‘ इकडे आड आणि इकडे विहीर ’ त्यांस झाली. इतक्यांत असें झालें कीं, सैन्यांतील कित्येक अधिकारी दरबारांत कांहीं कामानिमित्त गेले. त्यांनीं, पूर्वी सांगितलेल्या सहा अपराध्यांस मीं कसें वागविलें, याबद्दल सर्व कच्ची हकीकत दरबारास निवेदन केली. ती ऐकून सर्व मंत्रिमंडळ इतकें खूष झालें कीं, त्यांनीं तत्काळ खालीं लिहिल्याप्रमाणें माझ्या पोटापाण्याची वगैरे तजवीज ठेवण्याविषयीं हुकूम मिळावा म्हणून बादशाहास विनंति केली. ती अशीः— राजधानीपासून नऊशें यार्डांच्या आंतील लोकांनीं, मला जी शिधासामुग्री लागेल ती दररोज सकाळच्या प्रहरीं आणून हजर करीत जावी. बादशाहानेंही फार सुप्रसन्न होऊन वरील गोष्टीस आपला रुकार दिला; व याबद्दल एकंदर होणारा खर्च त्यानें आपल्या खाजगींतून देण्याचा हुकूम केला. कारण तेथील राज्यरीति अशी आहे कीं, फारच आणीबाणीच्या प्रसंगावांचून प्रजेवर कर ह्मणून कोणत्याही प्रकारचा बसवावयाचा नाहीं. मात्र लढाईचा वगैरे प्रसंग आल्यास रयतेनें आपल्या स्वतःच्या खर्चानें सैन्याची भरती केली पाहिजे असा तेथें नियम आहे. असो; वर लिहिल्याखेरीज आणखी माझ्या घरांतील व्यवस्थेकडे सहाशें मनुष्यांची नेमणूक झाली. त्यांना पोटखर्चापुरता रोजमुरा मिळत असे, व त्यांस राहण्यास माझ्या दरवाज्याच्या दोहों बाजूंकडे तंबू ठोकून दिले होते. शिवाय त्या देशाच्या रिवाजाप्रमाणें मजकरितां कपडालत्ता तयार करण्यास तीनशें शिंपी लावण्याचा हुकूम झाला; व बादशाहाच्या पदरचे सहा जाडे विद्वान् मला तिकडील भाषा शिकविण्याकरितां नेमिले; आणि बादशाहाचे व सरदार लोकांचे वगैरे घोडे व शिपाई यांस माझी ओळख पडण्याकरितां माझ्या समो-

रच त्यांची कवाईत करण्याचा हुकूम झाला. वरील सर्व हुकूम तत्काळ अमलांत आले. सुमारें तीन वारांतच माझी त्यांच्या भाषेंत पुष्कळ गति झाली. पुढें बादशाहाची स्वारी अनेक वेळां मजकडे आली. कधीं कधीं स्वारीनें स्वतः देखील मला शिकविण्याचे कामीं श्रम घ्यावे. आमचा परस्पर संवाद सुरू झाला तो असाः—मीं ह्मटलें, "महाराजांनीं दयावंत होऊन मला मुक्त करावें." त्यानें उत्तर दिलें कीं, "हें काम एकाएकीं होणारें नव्हे, त्याला दिनावधि पाहिजे; व तें आमच्या प्रधानमंडळीच्या सल्लामसलतीखेरीज होणें नाहीं. आणि प्रथमतः तुझा आमच्याशीं व आमच्या रयतेशीं कोणत्याही प्रकारचा वैरभावसंबंध नाहीं अशी तुला शपथ घेतली पाहिजे. तुला ह्मणजे आमच्याकडून कसलीही इजा पोहोंचेल असें तूं बिलकूल मनांत आणूं नको. स्वस्थ चित्तेंकरून सद्वर्तनानें आमची व आमच्या प्रजेची मर्जी संपादन कर. तसेंच तुझा झाडा घेण्यास आह्मी योग्य अधिकाऱ्यांस हुकूम देणार आहों; तर त्याबद्दल तुला वाईट वाटूं देऊं नको; कारण आह्मांस असा अंदेशा येतो कीं, तुझ्यापाशीं कांहीं हत्यारें असावीं, व तीं तुजसारख्या पर्वतप्राय मनुष्याचीं ह्मटलीं ह्मणजे अर्थातच फार भयंकर असलीं पाहिजेत." यावर मीं उत्तर दिलें की, "माझी कांहींएक हरकत नाहीं. मी महाराजांसमोर आपलें एकूनएक चिरगूट सोडून दाखविण्यास तयार आहें. महाराजांनीं आपली हवी तशी खातरी करून घ्यावी." बादशाहानें प्रत्युत्तर दिलें कीं, "या राज्याच्या चालीप्रमाणें आमच्या दोघां कामगारांनी तुझा झाडा घेतला पाहिजे, व आह्मी पक्कें जाणतों कीं, ही गोष्ट तुझ्या संमतीवांचून व साहाय्यावांचून सिद्धीस जाणें नाहीं. तर तुझें औदार्य व न्यायीपणा यांविषयीं आमची पूर्ण खातरी झाल्यावरून आह्मी मनांत बिलकूल अंदेशा न आणितां

सदर्हू अधिकाऱ्यांस तुझे स्वाधीन करितों. ते जी जी वस्तु तुजपासून घेतील ती ती तुझी तुला हा देश सोडून जाण्याचे वेळीं परत देण्यांत येईल. अथवा त्याबद्दल तूं जी सांगशील ती भरकिंमत तुला देण्यांत येईल. " त्या दोघां अधिकाऱ्यांस उचलून मीं हातांत घेतलें, आणि आपल्या अंगरखाबंडीच्या सर्व खिशांत क्रमाक्रमानें घातलें. फक्त माझा एक चोरखिसा व आणखी दोन लहान लहान खिसे येवढे काय ते वगळले. त्या लहान खिशापैकीं एकांत एक रुप्याचें लहान घड्याळ होतें, व दुसऱ्यांत थोडेसे सोन्याचे रज पिशवींत घालून ठेविलेले होते. पूर्वीं सांगितलेल्या उभयतां गृहस्थांजवळ कागद, शाई, लेखणी वगैरे सामान होतेंच. त्यांच्या जें जें दृष्टीस पडलें त्याचें त्यांनीं टांचण करून घेतलें. हें त्यांचें काम आटपल्यावर त्यांनीं आपणांस खालीं ठे[illegible] मला सांगितलें. नंतर त्यांनीं एकंदर चौकशीचा रपोट बादशाहाचे दरबारी सादर केला, त्यांतील मजकुराचें भाषांतर खालीं लिहिल्याप्रमाणें:—

" खावंदांचा पेशजी हुकूम झाल्याअन्वयें आम्ही ( खालीं सही करणार तपासनीस ) असा रपोट करितों कीं, पर्वतेश्वर (म्हणजे मोठा थोरला जिवंत पर्वतच अशा अर्थानें त्यांनी हें नांव मला दिलें असावें. ) याच्या अंगरख्याच्या उजव्या बाजूचा खिसा आम्हीं फार बारीक रीतीनें तपासला, व तपासाअंतीं आम्हांस त्यांत एक जाड कपडा, खावंदांच्या थोरल्या ऐनेमहालाच्या चादरीइतका लांबरुंद असा सांपडला. डाव्या बाजूच्या खिशांत एक भली जंगी रुप्याची पेटी सांपडली. तिचें झांकणही आम्हांस हालेना. तेव्हां आम्ही मशारनिल्हे पर्वतेश्वर यास सदर्हू पेटीचें झांकण काढण्यास सांगितलें. तें त्यानें काढिल्यावर [illegible] एकजण आंत उतरूं लागला तों आंत असलेल्या एके [illegible]

इतका तो गेला; व वर लिहिलली पेटींतील भुगटी आमच्या नाकातोंडावर उडाली, तिच्या योगानें आम्हांस जोरानें सटासट एकसारख्या कांहीं वेळ शिंका आल्या. त्याच्या बंडीच्या उजव्या कप्यांत आह्मांस एक मोठा थोरला पांढरा गठ्ठा सांपडला. त्यांत एकावर एक जुळून लावलेल्या अशा पांढऱ्या रंगाच्या पातळ वस्तु असून तो गठ्ठा मोठ्या बळकट चऱ्हाटानें आवळून बांधिलेला होता, व तो खावंदांच्या रयतेपैकीं तिघां अतिशय धिप्पाड पुरुषांच्या शरीराकाराऐवढा होता. त्याच्या आंतबाहेर जिकडे तिकडे काळ्या रंगाच्या आकृति काढिलेल्या होत्या. आमच्या अल्प बुद्धीस असें वाटतें कीं, हे पर्वतेश्वर याचे लेख असावे. त्यांतील प्रत्येक अक्षर अजमासें आमच्या अर्ध्या तळहातायेवढें होतें. डाव्या कप्यांत कांहीं एक प्रकारचें यंत्र होतें. त्याच्या मागच्या बाजूला अणकोचीदार लांब लांब वीस काठ्या होत्या. त्या कांहीं अंशीं सरकारच्या कचेरीच्या बडया दिवाणखान्यास ज्याप्रमाणें कठडे आहेत, तशा दिसल्या. पर्वतेश्वर हा त्या यंत्रानें आपल्या डोक्याचे केंस विंचरीत असेल, असें आह्मांस वाटतें. हें यंत्र व वर लिहिलेला पांढऱ्या वस्तूंचा गठ्ठा हीं काय आहेत, व त्यांचा तुला उपयोग काय, याबद्दल आम्हीं पर्वतेश्वर यास पुष्कळ प्रकारें शब्दांनीं व खुणांनीं विचारिलें. परंतु त्यास आह्मी काय विचारितों हें समजण्यास फारच अडचण पडूं लागली, ह्यास्तव आह्मींही त्यास विनाकारण त्रास देण्याचें सोडून दिलें. त्याच्या अंगावरील मधल्या भागाच्या प्रावरणाच्या मोठ्या कप्यांत ( हें प्रावरण म्हणजे माझा मांडचोळणा; परंतु त्यांच्या शब्दांचें वास्तविक भाषांतर वाचकांस कळावें म्हणून मीं वरील शब्दांची योजना केली आहे. ) आम्हांस एक पोकळ लोखंडी खांब सांपडला. त्याची उंची एक पुरुषभर असून तो एका मजबूत लांकडी तुळईला करकावून बांधिलेला होता. त्या

खांबाच्या एके बाजूस कांहीं चमत्कारिक तऱ्हेचे व अवजड असे पहारेसारखे लोखंडाचे खुंटे होते. डावे बाजूकडील कप्प्यांतही असलेंच एक यंत्र होतें. या दोन्ही यंत्रांचा काय उपयोग असावा याबद्दल आह्मांस कांहींच अनुमान होत नाहीं. उजवे बाजूकडील लहान कप्प्यांत लहानमोठे वाटोळे व सपाट असे तांबडया व पांढऱ्या धातूंचे तुकडे होते. त्या पांढऱ्या तुकडयांपैकीं कांहीं इतके जड होते कीं, आम्हां दोघांसही ते उचलण्यास पंचाईत पडली ! हे तुकडे रुप्याचे असावे असें आम्हांस वाटतें. डाव्या बाजूच्या लहान कप्प्यांत दोन ओबडधोबड खांब उभे होते. आम्हांस त्यांच्या शेंडयावर जाण्यास महाप्रयास पडले. त्यांपैकीं एक तर एकसारखाच येथून तेथून दिसत होता. परंतु दुसऱ्याच्या शेवटास चार मनुष्यांच्या डोक्यायेवढा एक वाटोळा पांढरा पदार्थ दृष्टीस पडला. या दोन्ही खांबांस मधून चिरा असून त्यांतून मोठाल्या पोलादी पट्ट्या होत्या. सदरील पट्ट्या काढून दाखविण्याविषयीं आम्हीं पर्वतेश्वर यास हुकूम केला; कारण तीं कदाचित् घातक यंत्रें असतील असा आम्हांस संशय आला. त्या पट्ट्या त्यानें उघडून दाखविल्या, आणि म्हणाला कीं, 'ह्यापैकीं एक पट्टी आमच्या देशांतील चालीप्रमाणें हजामत करण्यास लागते, व दुसरीचें काम जेवणाचे वेळीं पडतें.' ह्याखेरीज आणखी दोन छोटे कपे होते त्यांत आम्हांस जातां येईना. त्यांपैकीं उजव्यांत एक मोठी रुपेरी सांखळी होती. तिला फारच अद्भुत प्रकारचें एक गोलाकृति यंत्र लटकाविलेलें दृष्टीस पडलें. तें आमच्या आज्ञेवरून त्यानें उघडून दाखविलें. सदरचें यंत्र कांहीं रुपें व कांहीं एक प्रकारचा पारदर्शक पदार्थ मिळून बनविलेलें होतें. कारण त्याच्या आंतील एका बाजूवर कांहीं चमत्कारिक वाटोळ्या आकृति वगैरे काढिलेल्या होत्या त्यांस आह्मी

हात लावण्यास जों गेलों, तों त्या चकचकीत पदार्थावरच आमचे हात थांबून राहिले. हें यंत्र त्यानें आमच्या कानांशीं लाविलें तों त्याच्यांतून पाणचक्कीप्रमाणें एकसारखा चांगला आवाज ऐकूं येऊं लागला. आमची अशी कल्पना धांवते कीं हा एखादा प्राणी असावा, अथवा त्याचा देव असावा. पण हजार हिश्शांनीं देवच असावा. कारण पर्वतेश्वर याच्या सांगण्यांत असें आलें कीं, ( निदान तो जें कांहीं बोलला त्यावरून आमची तरी अशी समजूत झाली की, ) कोणतीही गोष्ट करणे झाली तरी मी ह्याचें अगोदर दर्शन घेतल्यावांचून करीत नसतों. तो आणखी असेंही म्हणाला कीं, ' हें माझें दैवतच आहे, व कोणती गोष्ट केव्हा करावयाची त्याची वेळ मला तें चासुविते. ' डावेकडील छोटया कप्यांतून एक माशांच्या जाळ्याएवढी पिशवी त्यानें काढून दाखविली. ती जाळीदार असून बटव्यासारखी उघडतां व बंद करितां येत असे. तिच्यांत आम्हांस पिवळ्या रंगाच्या धातूचे मोठेमोठे जड तुकडे आढळले. ते सोन्याचेच असल्यास त्यांची किंमत अनिर्वाच्य असली पाहिजे.

" सरकारचे हुकुमाअन्वयें सदरी लिहिल्याप्रमाणे पर्वतेश्वर याच्या एकूनएक खिशाचा आम्हीं फार दक्षतेन झाडा घेतला. याशिवाय आम्हांस त्याच्या कंबरेसभोंवतीं एक पट्टा असलेला दृष्टीस पडला. तो कोणत्या तरी एकाद्या प्रचंड जनावराच्या चामड्याचा केलेला असावा. त्या पट्ट्याला डावे बाजूकडे एक पांच पुरुष उंचीची तरवार लटकलेली होती; व उजवे बाजूकडे एक थैली असून तिला दोन घरें होतीं. दरएक घरांत, सरकारच्या रयतेपैकीं तीन पुरुष चांगले अघळपघळ राहतील, एवढीं तीं मोठीं होतीं. त्यांपैकीं एकांत कित्येक मोठमोठे गोळे होते. ते फारच कठिण धातूचे बनविलेले असून आमच्या डोक्यांएवढाले होते. ते उचलतांना आमचा तर पक्काच खट्टा मोकळा

झाला ! दुसऱ्या घरांत एके प्रकारच्या काळ्या रंगाच्या दाण्यांच मोठा ढीग होता. ते दाणे बारीक असून वजनांतही फारसे नव्हते. कारण त्यांपैकीं तीसतीस चाळीसचाळीस देखील आम्हं आपल्या हातांवर एकदम ठेवीत असूं.

" याप्रमाणे पर्वतेश्वर याच्या अंगावर सांपडलेल्या हरएव वस्तूची वरील रपोटांत नोंद केली आहे. सदर्हू झाडा घेत अ सतां पर्वतेश्वर यानें आमचा योग्य मानमर्तबा ठेवून सरकारचे दर्ज्यास व हुकुमास अनुलक्षून एकंदरीनें बहुत उत्तम प्रका वर्तन केलें. हा रपोट खावंदांच्या अमदानीच्या ८९ व्या महि न्याच्या चवथे तारखेस पुरा करून आम्हीं आपले सहीशिक्क्या निशीं सादर केला असे.

( सही ) क्लेफ्रिन् फ्रेलॉक.

( सही ) मार्सि फ्रेलॉक. "

सदरील रपोटाची सुनावणी होतांच रपोटांत नमूद असलें सर्व जिन्नस हुजूर आणावे म्हणून मला बादशाहाचा हुकूम झाल मीं ते घेऊन आल्यावर त्यानें प्रथमतः मला आपली समशे दाखविण्याविषयीं सांगितलें. ती म्यान वगैरेसुद्धां मीं काढू पुढें ठेविली. तेव्हां लागलीच त्यानें आपल्या सैन्यापैकी निव डक तीन हजार लोकांस तीरकमठे सज्ज करून मजसभोंवत गराडा घालण्यास आज्ञा केली. नंतर त्यानें समशेर म्यानांतू काढण्याविषयीं मला हुकूम केला. ती मीं काढिली तों सैन्यांती सर्व लोक भयानें आणि आश्चर्यानें चकित होऊन मोठ्यानें ओर लागले. कारण त्या वेळेस ऊन लखलखीत पडलें होतें, व मी समशे फिरवूं लागलों तेव्हां तिच्या कवडशानें त्यांचे डोळे दिपून गेले. तरं बरें झालें कीं, ती समुद्राच्या पाण्यांत बुचकळल्यामुळें कांहीं गंजल होती; नाहीं तर तिचा कवडसा याहीपेक्षां स्वच्छ पडून त्यांस कदाचित् असें वाटलें असतें कीं, हे काय सूर्यानें आपले बार

डोळे उघडले कीं काय कोण जाणे! असो; पण बादशाहास वरील गोष्टीचें इतरांसारखें फारसें भय वाटलें नाहीं. कारण तो मोठा शूर आणि धैर्यवान् पुरुष होता. त्यानें मला लागलीच ती तरवार म्यानांत घालण्यास सांगून हलकेच जमिनीवर ठेवण्याविषयीं हुकूम केला. त्याप्रमाणें मीं केल्यानंतर मागें रपेटांत दाखल असलेला एक पोकळ खांब (ह्मणजे माझें पिस्तूल) काढून दाखविण्यास त्यानें आज्ञा केली. तें मीं बाहेर काढिलें, व त्याच्या हुकुमावरून सदहू पिस्तुलाचा उपयोग काय हें मीं आपल्याकडून झाली तितकी पराकाष्ठा करून त्यास सांगितलें; व त्याचा जो मी आतां प्रयोग करणार, त्यापासून कोणाच्या केंसासही धक्का पोहोंचणार नाहीं अशी अनेक प्रकारें त्याची खातरी करून त्या पिस्तुलाचा एक वायबार केला. त्याच्या आवाजानें सर्वांस जें कांहीं भय व आश्चर्य वाटलें, त्यापुढें पूर्वी सांगितलेल्या तरवारीच्या कवडशाचें कांहींच नाहीं असें ह्मटलें पाहिजे! शेंकडोंच्या शेंकडों लोक धडाधड जमिनीवर मृतवत पडले. प्रत्यक्ष बादशाहाची देखील गाळण होऊन गेली! तो आपल्या जाग्यावरून ढळला नाहीं खरा, तथापि अगदीं बेशुद्ध झाल्यासारखा दिसत होता. पण लवकरच तो पूर्ववत् हुशार झाला. नंतर मीं आपलीं दोन्ही पिस्तुलें व दारूगोळा त्याच्या पुढें ठेविला, आणि विनंतिपूर्वक सांगितलें कीं, विस्तवाच्या संबंधानें दारूस फारच जपलें पाहिजे; कारण ती येवढ्याशा देखील ठिणगीनें पेटून एका क्षणांत राजवाड्याचा राजवाडा वर उडवून देईल. हें झाल्यावर मीं आपलें घड्याळ पुढें केलें. तें पहाण्याविषयीं बादशाहास फारच उत्कंठा झाली होती. त्यानें आपल्या दोघां मोठ्या उंच धिप्पाड हुजऱ्यांस तें उचलण्यास सांगितलें. त्यांनीं त्यास दोऱ्या बांधून मध्यें बांबू घालून तें उचलिलें. त्याचा तो टिकटिक आवाज आणि मिनिटकांट्याची

गति यांचें त्यास परम आश्चर्य वाटलें. सहहूबद्दल त्यानें आपल्या विद्वान् मंडळीची मतें विचारलीं, तीं अर्थाताच निरनिराळीं आणि चमत्कारिक पडलीं. असो; नंतर मीं आपल्या जवळचें सोन्यारुप्याचें नाणें, तसेंच आणखी कांहीं सोनें होतें तें, चाकू वस्तरा, कंगवा, तपकिरीची रुपेरी डबी, रुमाल, आणि टांचणवही हीं सर्व काढून पुढें ठेविलीं. हे एकंदर सर्व पदार्थ पहाणें झाल्यावर त्यांपैकीं फक्त माझी तरवार, पिस्तुलें, व दारूगोळ्याची पिशवी इतकीं सरकारी खजिन्यांत नेऊन ठेवण्याचा हुकूम झाला. त्याप्रमाणें तीं गाड्यांवर घालून नेलीं, व बाकीच्या सर्व चिजा माझ्या मला परत मिळाल्या.

पूर्वी सांगण्यांत आलें आहे कीं मी आपला झाडा देते वेळीं माझे दोन लहान कपे व एक चोरखिसा यांत त्या तपासणारांस घातलें नाहीं. आतां ह्या दोन कप्यांत त्यांस ह्मणजे मीं मुद्दाम घातलें नाहीं असें नाहीं, तर त्यांना त्यांत शिरतांच येईना, ह्मणून माझा नाइलाज झाला. तथापि त्यांत ज्या जिनसा होत्या त्या मीं त्यांस काढून दाखविल्या, हें मागें वाचणारांच्या लक्षांत आलेंच असेल. पण मीं वर जो चोरखिसा ह्मणून सांगितला तो मात्र बुद्ध्या त्यांस दाखविला नाहीं, व त्यांच्याही नजरेंत तो आला नाहीं. त्यांत माझा चष्मा होता. माझी दृष्टि अधू असल्याकारणानें मला त्याची फार अवश्यकता होती. तसेंच त्यांत माझी दुर्बीण व दुसऱ्या कित्येक लहानसान उपयोगीं वस्तु होत्या. मदरील वस्तूंचा बादशाहास तादृश उपयोग नसल्यामुळें त्या न दाखविण्यांत म्हणजे कांहीं प्रमाद आहे असें मला वाटलें नाहीं, सबब मीं दाखविल्या नाहींत. खेरीज त्या कदाचित् त्या लोकांच्या हातून खराब झाल्या अगर हरवल्या तर आपली फारच अडचण होईल अशीही मला भीति वाटली.

---

## प्रकरण ३.

माझा सुस्वभाव आणि सद्वर्तन यांचा ठसा बादशाहा आणि त्याचे दरबारी लोक, त्यांत विशेषतः लष्करी लोक यांच्या मनावर इतका बसला कीं, आतां आपलें बंधविमोचन अल्पकालेंकरूनच होईल असें मला वाटूं लागलें; व मीही आपली [illegible] होईल तितकी उत्तरोत्तर अधिकाधिक [illegible]विण्याविषयीं यत्न करूं लागलों. लोकांना माझी भीति दिवसेंदिवस कमी वाटावयास लागली. मी केव्हां केव्हां जमिनीवर उताणा पडें, आणि त्यांपैकीं पांचपांच सहासहाजणांस आपल्या हातावर नाचवीत असें; व त्यांची माझी शेवटीं येवढी सलगी पडून गेली कीं, लहान लहान पोरें व पोरी हीं देखील निर्धास्तपणें माझ्या डोक्याच्या केंसांत लपंडाव खेळूं लागलीं!

तमाशे आणि कसरती करण्यांत त्या लोकांच्या चातुर्याची व बुद्धिकौशल्याची तर कमालच आहे! आजपर्यंत जीं जीं राष्ट्रें माझ्या पाहण्यांत आलीं त्या सर्वांमध्यें वरील कलेंत हें राष्ट्र केवळ अद्वितीय आहे, असें मला म्हटल्यावांचून रहावत नाहीं. एके दिवशीं बादशाहानें मजपुढें कांहीं कसरती व खेळ करविले. यांत दोन काठया एकेक फूट उंच अशा दोन फुटांच्या अंतरावर जमिनींत रोंवून त्यांस बारीक दोरी बांधून तिजवर नाचणें व उडया मारणें, ह्या खेळाची मला अतिशयच मौज वाटली.

ज्या कोणास एकादा सरकारी हुद्दा मिळवावयाची अगर बादशाहाची मर्जी संपादावयाची इच्छा असते, तेच लोक वर सांगितल्या प्रकारचे खेळ खेळतात. त्यांनीं ह्या कलेचा अभ्यास लहानपणापासून केलेला असतो, व ते मोटया कुळांतले अथवा चांगले शिकलेले असतात असा कांहीं नियम नाहीं. जेव्हां कोणी एकादा हुद्देदार मरण पावल्यामुळें अथवा कांहीं गुन्ह्यांत येऊन बरतर्फ झाल्यामुळें त्याची जागा रिकामी

होते, तेव्हां या तयार झालेल्या उमेदवार मंडळीचे अर्ज बादशाहाचे हुजरास येतात. मग एके दिवशीं दरबार भरून सर्व अर्जदारांची मागें सांगितल्याप्रमाणें नाचणें व उड्या मारणें यांत बादशाहासमक्ष परीक्षा होते. तेव्हां जो कोणी खालीं न पडतां सर्वांहून अधिक उंच उडी मारतो त्यास ती जागा मिळते. पुष्कळ वेळां असें घडतें कीं, मुख्य प्रधानास देखील आपण संपादलेली विद्या मलिन झाली नाहीं अशी बादशाहाची खातरी करण्याकरितां या प्रकारें आपलें चातुर्य दाखविण्याची पाळी येते. फ्लिम्नॅप, बादशाहाचा मुख्य खजानजी, हा तर या कलेंत त्या सर्वांचें केवळ शिरोरत्नच होऊन राहिला आहे! त्याची बरोबरी कोणाच्यानेंही होणें नाहीं. कारण कोणी कसाही कसबी आला तरी याची उडी आपली त्याच्यापेक्षां एक इंच तरी उंच जावयाचीच! कित्येक वेळां तर सुतळीएवढ्या दोरावर एक काथवट बांधून त्यावर उलटी उडी मारून डोकें खालीं व पाय वर असा कांहीं वेळ उभा राहिलेला मीं त्यास समक्ष पाहिला आहे! माझा परम मित्र रेल्ड्रेसल्, खाजगीकडील मुख्य अधिकारी, हा फ्लिम्नॅपच्या जोडीचा जरी नाहीं, तरी त्याच्या खालोखाल आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. बाकीचे सर्व मोठमोठे कामगार रेल्ड्रेसलच्या खालच्या पायरीचे असून ते बहुतकरून सर्व सारखेच कसरती आहेत.

पुष्कळ लोकांस वरील खेळापासून अनेक वेळां चांगली अद्दल घडलेली असून त्याबद्दल सरकारी दप्तरांत शेंकडों दाखले सांपडतात. कोणाचा हात मोडतो, कोणाचा पाय मोडतो, कोणाची कंबर मोडते, अशा अनेक लोकांस ठोकरा बसतात. चार पांच उदाहरणें तर मीं प्रत्यक्ष पाहिलेलीं आहेत. पण याहीपेक्षां जेव्हां प्रधानांस स्वतः आपलें कौशल्य दाखविण्याची वेळ येते, तेव्हां तर वरच्याहूनही मोठे अपघात होतात. कारण प्रत्येकजणास आपला वरचढपणा व्हावा असें वाटत असतें, या-

मुळें चुरशीनें जो तो अधिक उंच उडी मारावयास पहातो. तेव्हां अर्थातच कोणाचाही एकदां तरी मोधळा आपटला नाहीं असें होतच नाहीं! मला एकानें अशी गोष्ट सांगितली कीं, नुकता तुम्ही येथें येण्यापूर्वीं एक दोन वर्षें असाच एकदां खेळ चालला असतां फ्लिम्नॅप साहेब उडी चुकून खालीं पडले; तेव्हां त्यांची मानच मोडावयाची, पण बरें झालें कीं, सुदैवें-करून तेथें एक लोड पडलें होतें त्यावर त्यांचें डोकें आपटलें; नाहींपेक्षां त्या दिवशीं त्यांजवर मोठा कठिण प्रसंग आला होता!

सैन्यांतील व सरकारी पागेंतील घोडे दररोज माझ्यासमोर कवाइतीकरितां आणीत असत; यामुळें हल्लीं त्यांस माझी अ-गदीं भीति वाटेनाशी झाली. ते बिलकूल न बिचकतां अगदीं माझ्यासरसे येऊं लागले. मीं आपला हात भुईवर आडवा ठे-विला असतां कधीं कधीं स्वार लोक घोड्यावर बसून माझ्या हातावरून पलीकडे उडी मारीत असत. एकदां तर बादशाहाचे शिकारी लोकांपैकीं एकजण एका मोठ्या खंद्या घोड्यावर बसला, आणि माझ्या पायांत जोडा वगैरे असतां त्यावर त्यानें उडी मारिली!

एके दिवशीं बादशाहास एक विलक्षण तऱ्हेची गंमत करून दाखविण्याचें सुदैवेंकरून माझ्या मनांत आलें. तेव्हां दोन फूट उंच व साधारण वेताच्या छडीइतक्या जाड अशा कांहीं काठ्या मला आणून देण्याविषयीं हुकूम व्हावा अशी मीं त्यास विनंति केली. मग तत्काळ रानखात्याकडील मुख्य अधिकाऱ्यास त्याबद्दल सरकारांतून हुकूम सुटला. दुसरे दिवशीं सकाळीं आठ आठ घोडे जुंपलेल्या पांच सहा गाड्या सदहू प्रकारच्या काठ्यांनीं भरले-ल्या मजपाशीं येऊन थडकल्या. मीं त्यांतून नऊ काठ्या घे-ऊन जमिनींत त्या चतुष्कोणाकृति उभ्या पुरल्या. हा सुमारें सात आठ चौरस फुटांचा चौथरा झाला. नंतर आणखी चार काठ्या घेऊन त्या चौथऱ्याच्या बाजूंच्या काठ्यांस मीं समांतर

आडव्या बांधिल्या, आणि आपला हातरुमाल वरील नऊ काठ्यांस, एकादा डफ मढवितात त्याप्रमाणें साफ घट्ट बांधिला. ज्या चार काठ्या आडव्या बांधिल्या होत्या, त्या सुमारें पांच



माझ्या जोड्याच्या पायावर त्याने उडी मारिली ! ( पृ. ३८. )

इंच त्या रुमालापासून वर रहाव्या असा मीं तो बांधिला; यामुळें त्या काठ्या कठड्यांप्रमाणें झाल्या. माझें हें कृत्य आटोपल्यावर मीं बादशाहास विनंति केली कीं, आपल्या घोडेस्वारांच्या एका

निवडक टोळीस ह्या रंगणावर कवाईत करण्याविषयीं हुकूम व्हावा. खासा स्वारीस ही गोष्ट मान्य झाली. ते स्वार आपला लष्करी पोषाक व हत्यारें घेऊन घोड्यांवर बसल्यावर तसेच तसेच मीं त्यांस आपल्या हातांत घेऊन वर चढाविलें. त्यांत त्यांचे कम्यांडर होतेच. त्यांनीं त्या स्वारांस व्यवस्थित रीतीनें उभें केल्यावर त्यांच्या निरनिराळ्या टोळ्या करून त्या प्रत्येकीवर एकेकजण मुख्य झाला. मग त्यांनीं लुटुपुटीच्या लढाया केल्या, एकमेकांवर बोथटलेल्या तिरांचा वर्षाव केला, पट्टे फिरविले, धुमा ठोकल्या, व पाठलाग केले—अशा अनेक तऱ्हेच्या कवाइती केल्या. खरोखर असे उत्तम प्रकारें कवाईत शिकलेले हुशार लोक हे प्रथमच माझ्या दृष्टीस पडले. वर सांगितलेंच आहे कीं त्या रंगणास कठड होते, त्यामुळें त्यांस त्यावरून खालीं पडण्याचीही भीति मुळींच नव्हती. असो; एकंदरीनें हा खेळ फारच बहारीचा झाला, व तेणेंकरून बादशाहा इतका खूष झाला कीं, त्यानें तो आणखी कित्येक वेळां करविला. एकदां तर स्वारीनें आपल्या स्वतःसच उचलून रंगणावर ठेवण्याविषयीं मला आज्ञा केली. त्याप्रमाणें मीं केल्यावर आपण खुद्द कम्यांडर होऊन कवाइतीचा हुकूम फर्माविला. तेव्हां तर पाहणाऱ्यांची इतकी गर्दी जमली होती कीं, आंत मुंगी सुद्धां शिरकण्यास रीघ नव्हती; कारण त्या वेळचा देखावा अपूर्वच होता. राणीसरकारची स्वारी खालीं जमिनीवर असल्यामुळें त्यांस ती गम्मत पुरतेपणीं दिसेना. सबब सरकारचे सांगण्यावरून मीं त्यांस त्यांच्या खुर्चीसकट उचलून रंगभूमीच्या जवळ धरिलें, तेव्हां त्यांस तें सर्व चांगलें दिसूं लागलें.

असो; हे खेळ चालले असतां सुदैवेंकरून एक बरें झालें कीं, कोणास कांहीं दुखापत वगैरे झाली नाहीं. फक्त एकदां एका कप्तानाचा घोडा जोरानें एकाएकीं पाय झाडूं लागला, तो

त्याच्या खुरांच्या टापांनीं माझ्या रुमालास भोंक पडलें. त्यामुळें त्याचा पाय घसरून तो व त्याच्या वरचा स्वार हे दोघेही खालीं आले. परंतु मीं त्यांस लागलेंच उठविलें, आणि एक हात भोंकाखालीं धरून दुसऱ्या हातानें स्वार वगैरेंस खालीं उतरलें. त्या पडलेल्या घोड्याच्या डाव्या बरगडीस थोडीशी इजा झाली; पण वरचा स्वार निभावून गेला. पुढें मीं आपल्या रुमालास रफू वगैरे केला. पण मग तो असल्या जोखमीच्या कामांत कधींही घातला नाहीं.

नंतर कांहीं दिवसांनीं बादशाहा दरबारांत बसला असतां मी अशाच प्रकारचा एक खेळ करीत होतों, इतक्यांत घाईघाईनें एक जासूद येऊन सरकारांस खालीं लिहिल्याप्रमाणे हकीकत सांगूं लागलाः—"पर्वतेश्वर यास प्रथमतः ज्या ठिकाणीं कैद केलें होतें, त्या ठिकाणाच्या नजीकच, खावंदांच्या रयते-पैकीं कांहीं असामी घोडयावर बसून चालले असतां त्यास एक मोठा थोरला काळ्या रंगाचा पदार्थ जमिनीवर पडलेला आढळला. त्याचा आकार फारच विलक्षण तऱ्हेचा असून त्याची खालची बाजू, ह्मणजे तो जमिनीवर पडला आहे ती बाजू, अगदीं वाटोळी गरगरीत आहे. त्याची लांबीरुंदी सरासरी सरकारच्या रंगमहालाइतकी असून उंची एक पुरुषभर आहे. पहिल्यानें त्यांस वाटलें होतें कीं, हा कोणी तरी प्राणी असावा. परंतु त्याची हालचाल कांहींच दृष्टीस पडेना; तेव्हां त्यांचे लक्षांत आलें कीं, हा कांहीं सचेतन पदार्थ नव्हे. मग एकमेकांच्या खांद्यावर चढून ते त्या पदार्थाच्या शेंडयावर गेले, आणि त्यांनीं त्यावर पाय वगैरे आदळले; त्यावरून त्यांस असें वाटलें कीं, तो पोकळ असावा. ही कांहीं तरी पर्वतेश्वर ह्याची जिन्नस असावी असा त्यांचा तर्क आहे. हुकूम झाल्यास सदहू जिन्नस सरकारचे हुजुरास आणण्यास ते लोक तयार आहेत." याप्रमाणें त्या जासुदाचें बोलणें संपल्यावर,

तो कोणत्या [illegible] इतका वेळ बोलला हें माझ्या ध्यानांत आलें, व ती सांपडल्याचा मला फार आनंद झाला. आमचें गलबत फुटल्यावर मीं आपली टोपी दोरीनें डोक्यास बांधली होती; व मला असें वाटतें कीं, मी पुढें जमिनीवर येऊन पोहोंचलों तेव्हां ती दोरी तुटून किंवा इतर कोणत्याही रीतीनें ह्मणा, ती टोपी पडली असावी. त्या वेळीं माझा सर्व घोंटाळा होऊन गेला होता, आणि मला थकवा तर पराकाष्ठेचा आला होता. यामुळें कसलीही वास्तपुस्त न करितां मीं एकदांचें धरणीस अंग टाकलें. त्यानंतर पुढें झालेला वृत्तांत तर इत्थंभूत कथन करण्यांत आलाच आहे. अस्तु, मीं बादशाहास त्या टोपीचा उपयोग वगैरे सांगून विनंति केली कीं, होईल तितक्या त्वरेनें ती मजकडे आणण्याविषयींची मेहेरबानीनें तजवीज व्हावी. त्याप्रमाणें बादशाहाचा हुकूम होतांच दुसरे दिवशीं गाडीवाले तिजसकट मजपाशीं येऊन दाखल झाले. त्या कामांत त्यांस फारच मेहनत पडली. त्यांनीं त्या टोपीला कांठापासून सुमारें दीड इंचाच्या अंतरावर दोन भोंकें पाडिलीं, आणि त्या भोंकांत दोन आंकडे अडकवून त्या आंकड्यांस दोऱ्या बांधिल्या, व त्या दोऱ्या गाडीच्या जोतास बांधून त्या बिचाऱ्या टोपीस सुमारें अर्धा मैलपर्यंत फरपटत ओढीत आणलें ! परंतु त्या देशांतील जमीन आतिशय साफ आणि मऊ असल्याकारणानें तिची फारशी खराबी झाली नाहीं.

यानंतर एके दिवशीं बादशाहानें राजधानींतील व राजधानीचे आसपास असणाऱ्या सर्व सैन्यास तयारींत असण्याविषयीं हुकूम करून फारच चमत्कारिक तऱ्हेची एक गम्मत करण्याची शक्कल काढिली. ती अशीः—त्यानें मला आपले पाय होतील तितके फांकटून ताठ एकाद्या पुतळ्याप्रमाणें उभें राहण्यास सांगितलें. नंतर आपल्या सेनापतीस, त्या सैन्याच्या

रांगा जवळ जवळ उभ्या करून माझ्या दोहों पायांमधून त्यांचें कूच करविण्याची आज्ञा केली. सेनापति हा जुना माहितगार व आपल्या कामांत फारच वाकबगार असून दरबारांत मला त्याच्या इतकें दुसऱ्या कोणाचेंही पाठबळ नव्हतें. त्यानें ही कवाईत फारच उत्तम तऱ्हेची वठविली. दरएक ओळ पायदळ पलटणींतील चोवीस शिपायांची, व घोडेस्वारांपैकीं सोळांची, अशा एकामागे एक उभ्या करून एकंदर चार हजार सैन्यानें वर सांगितल्याप्रमाणें माझ्या पायांमधून कूच केलें! त्या वेळीं नौबती वाजत होत्या, निशाणें फडकत होतीं, असे अनेक प्रकार त्यांतल्या त्यांत केले असल्यामुळें कवाइतीस फारच रंग आला होता.

मीं आपल्या बंधविमोचनासाठीं सरकारचे हुजुरास एकापाठीमागून एक पुष्कळ अर्ज केले, परंतु त्या प्रकरणाची सुनावणी आजची उद्यांवर, उद्यांची परवांवर, अशी लांबतां लांबतां जी मागें पडली ती कित्येक दिवसपर्यंत तशीच पडली. नंतर एके दिवशीं बादशाहानें दरबारांत एकदांची त्या प्रकरणाविषयीं गोष्ट काढिली, आणि त्याबद्दल प्रत्येकाचें काय मत आहे म्हणून प्रश्न केला. तेव्हां स्कायरेश बोल्गोलम् खेरीज करून बाकीच्या सर्व प्रधानांनीं सदरील गोष्टीस आपला रुकार दिला. वरील नांवाचा प्रधान हा गाल्बेट म्हणजे आरमारावरील मुख्य अधिकारी होता. तो आपल्या धन्याच्या अत्यंत कृपेंतला असून त्याचा त्यावर पूर्ण भरंवसा होता. कांहीं देखील कारण नसतां त्यानें माझ्याशीं हाडवैर पहिल्यापासून धरिलें याचें मला मोठें नवल वाटलें. तथापि बहुमत पडल्यावरून त्याचा कांहीं इलाज चालला नाहीं; तरी त्याच्या हट्टामुळें दरबारांत पुष्कळ भवतिनभवति होऊन अखेर निकाल काय होतो कोण जाणे याचें मला मोठें भय पडलें होतें. पण शेवटीं बादशाहाचाही कल

माझ्या तर्फेचा पाहून त्यानें मोठ्या कष्टानें रुकार दिला. तेव्हां सर्वांस आनंद होऊन, बादशाहानें त्या ठरावास आपली मंजुरी दिली. गाल्बेट याचें मन खट्टू झालें व त्याचा किंचित् अपमानही झाला, असें वाटल्यावरून त्याचा दिल पूर्ववत् खूप राहण्याकरि-



" चार हजार सैन्यानें... माझ्या पायांमधून कूच केलें !" (पृष्ठ ४३.)

तां सर्वानुमतें त्याजकडे एक विशेष सन्मानाचें काम सोंपविण्याचें ठरलें. तें हें कीं, मला ज्या शर्तींवर खुलें करावयाचें त्या शर्ती वगैरे सर्व त्यानें आपल्या मुखत्यारीनें ठरवाव्या. वर सांगितलेलीं शर्तींचीं कलमें घेऊन, स्कायरेश बोल्गोलम् हा स्वतः

बरोबर दोन दुय्यम चिटणीस व कित्येक बडे लोक घेऊन मज-कडे आला. मला ते सर्व कागद वाचून दाखविल्यानंतर त्या-बरहुकूम मी वर्तन करीन अशाबद्दल शपथ घेण्यास मला सांगितलें. ती प्रथम मला आपल्या देशाच्या चालीप्रमाणें व नंतर त्यांच्या कायद्यांत न[illegible]प्रमाणें घ्यावी लागली. ही दुसरी रीत अशी कीं, उजवा पाय डाव्या हातांत धरावयाचा, व उजव्या हाताचें मधलें बोट मस्तकाच्या अग्रभागीं ठेवावयाचें, आणि आंगठा उजव्या कानाच्या पाळीवर ठेवावयाचा, व नंतर शपथ घ्यावयाची. आतां त्या लोकांची लिहिण्याची व आपलें मनोगत प्रकट करण्याची जी एक विशेष प्रकारची पद्धत आहे ती थोडीबहुत तरी वाचकांच्या लक्षांत यावी, व माझी मुक्तता होण्यास कोणत्या गोष्टी कारणीभूत झाल्या हेंही ध्यानांत यावें, एतदर्थ त्या एकंदर प्रकरणाचें भाषांतर मीं खालीं दिलें आहे.

"**गोल्बास्टो मोमॅरेमू गुर्डिलो इव्हलम् शेफिनू मुल्लि उल्लि ग्वे,** लिलिपटचे महापराक्रमी बादशाहा, जे सर्व जगतास सुगंधि पुष्पाप्रमाणें आनंद देणारे, व वज्राप्रमाणें कठोर; ज्यांच्या साम्राज्याचा प्रसार भूगोलाच्या सर्व सीमांपर्यंत झालेला असून ज्या राज्याचा परीघ ५,००० ब्लस्ट्रग्झ् ( सुमारें ६ कोश ) आहे; जे राजाधिराज पृथ्वीवरील सर्व मनुष्यांपेक्षां उंच; ज्यांचे चरण पाताळास लागून मस्तक सूर्यमंडळास भेदून जातें; ज्यांच्या नेत्राचें पातें लवतांच भूमंडळावरील सर्व राजे हात जोडून उभे राहतात; जे वसंतऋतूप्रमाणें आल्हाद्कारक; मेघाप्रमाणें उदार व हेमंताप्रमाणें दुःसह; असे जे राजाधिराज महाराज, त्यांचा, नुक्ताच ह्या राज्यांत आलेला जो पर्वतप्राय मनुष्य पर्वतेश्वर, त्यास, खालीं लिहिलेल्या अटींप्रमाणें त्यानें वागावें याविषयीं हुकूम होत आहे. त्या अटींचीं कलमें येणेंप्रमाणें:—

'१ लें, पर्वतेश्वर यानें आमच्या बादशाही शिक्कामोर्तबासह लेखी परवाना घेतल्यावांचून आमच्या राज्यांतून निघून जाऊं नये.

'२ रें, त्यानें आमच्या राजधानींत आमच्या आज्ञेखेरीज पाऊलही टाकूं नये; व तशी आज्ञा करण्याच्या वेळीं शहरवासी लोकांत, त्यांनीं रस्त्यांत बिलकूल फिरकूं नये, तर आपापल्या घरांत जावें, [illegible] दोन तास अगोदर दवंडी पिटविण्यांत येईल.

'३ रें, मशारनिल्हे पर्वतेश्वर यानें जे मोठमोठे रहदारीचे रस्ते आहेत त्यांवरूनच फक्त चालावें, धान्याचीं शेतें आणि गुरें चारण्याचीं रानें यांत फिरूं अगर निजूं नये.

'४ थे, तिसरे कलमांत नेमिलेल्या रस्त्यांतून तो फिरत असतां त्यानें आमच्या रयतेपैकीं कोणीही मनुष्य, किंवा त्याचे घोडे, गाड्या वगैरे आपल्या पायांखालीं तुडवल्या जाऊं नयेत अशाविषयी खबरदारी ठेवावी; व आमच्या रयतेपैकी कोणाही मनुष्यास त्याच्या इच्छेशिवाय आपल्या हातांत उचलून घेऊं नये.

'५ वें, जर एकादा जासूद कांहीं जरुरीच्या कामाकरितां फारच सत्वर कोठें पाठविण्याचें कारण पडेल, तर पर्वतेश्वर यानें त्यास त्याच्या [illegible] आपल्या खिशांत घालून नेलें पाहिजे; व कारण पडल्यास सदर्हू जासुदास आमचे हुजूर सुरक्षित आणून पोंचविलें पाहिजे. परंतु त्यास हे काम महिन्यांतून सहा दिवसांतून अधिक करावें लागणार नाहीं.

'६ वें, ब्लेफुस्कू द्वीपांत जे आमचे शत्रु आहेत, त्यांच्याशीं लढण्यास त्यानें आह्मांस साह्य केलें पाहिजे, व हल्लीं त्यांचें जें आरमार आह्मांवर चाल करून येण्याच्या बेतांत आहे, त्याचा नाश करण्याची होईल तितकी तजवीज केली पाहिजे.

'७ वें, सदर्हू पर्वतेश्वर यानें आपल्या रिकामपणाच्या वेळांत आमच्या कारखान्यांवरचे लोकांना, आमच्या मुख्य शिकारखान्यास व दुसऱ्या कित्येक सरकारी वाड्यांस तट बांधण्याकरितां जे मोठमोठे दगड लागतील, ते आणून देण्यास व उचलण्यास मदत केली पाहिजे.

'८ वें, सदर्हू पर्वतेश्वर यानें दोन महिन्यांचे आंत आमच्या राज्याच्या भोंवतालचे किनाऱ्यावरून फिरून आपल्या पावलांनीं आमच्या राज्याचा बरोबर घेर किती आहे तें आम्हांस विदित केलें पाहिजे.

'९ वें, सदरील आठ कलमांत लिहिल्याअन्वयें आपलें वर्तन ठेवण्याविषयीं मशारनिल्हे पर्वतेश्वर यानें शपथ घेतल्यावर त्यास आमच्या रयतेपैकीं १७२४ इसमांस लागणारें अन्न व पाणी दररोज मिळत जाईल; तसेंच आमची भेट घेण्यास त्यास सदर परवानगी मिळून आमची दुसऱ्याही कित्येक प्रकारांनीं त्याजवर मेहेरनजर होईल.'

येणेंप्रमाणें नऊ कलमांस आज रोजीं म्हणजे आमच्या कारकीर्दीच्या ९१ व्या महिन्याच्या १२ व्या तारखेस मुक्काम बेल्फाबोरॅक येथील आमच्या राजवाड्यांत मंजुरी देण्यांत येत आहे."

मीं मोठ्या आनंदानें वरील कलमांत लिहिल्याप्रमाणें वागण्याविषयीं शपथ घेतली. यांत कित्येक गोष्टी किंचित् अपमानास्पद होत्या यांत संशय नाहीं. पण त्या असण्याचें कारण स्कायरेश बोल्गोलम् याचें माझ्याशीं हाडवैर हेंच होय, दुसरें कांहीं नाहीं. असो; याप्रमाणें शपथेचा विधि होतांच तात्बडतोब माझ्या बिड्या काढून टाकून मला मोकळें केलें. त्या समयीं बादशाहानें तेथें समक्ष येऊन तो प्रसंग साजरा केला. मजवर केलेल्या दयेबद्दल मीं आपली कृतज्ञता दाखविण्यासाठीं बादशाहाचे पायांवर मस्तक ठेविलें. परंतु लागलेंच त्यानें मला उठून उभें राहण्यास सांगितलें, व माझी पुष्कळ प्रशंसा केली. ती मी आपली आपणच सांगूं लागलों तर उपहासास पात्र होईन ह्मणून सांगत नाहीं. आणखी शेवटीं तो असें म्हणाला कीं, "पर्वतेश्वर, तूं आमचे पदरीं राहून चांगलें नांव मिळविशील, व तुजवर आजपर्यंत आमची जी मेहेरनजर झाली व पुढें होईल

तीस तूं खरोखर पात्र आहेस असें दाखविशील, अशी आह्मांस फार उमेद आहे. ”

कदाचित् वाचकांचें असें ह्मणणें पडेल कीं, मागें सांगितलेल्या कलमांपैकीं शेवटल्या कलमांत, बादशाहानें मला १७२४ लिलिपटियन् लोकांना लागणाऱ्या अन्नपाण्याची रोजची नेमणूक ठरविली असें म्हटलें आहे, तर असा नक्की हिशेब त्या लोकांस कसा करतां आला ? याचें उत्तर असें कीं, बादशहाचे पदरचे जे गणिती लोक होते त्यांनीं तुरीय यंत्रानें (सूर्ययंत्रानें) माझी उंची प्रथम काढून, त्यांच्यापैकीं एका मनुष्याच्या उंचीशीं माझ्या उंचीचें १ : १२ असें प्रमाण बसविलें. नंतर माझ्या एकंदर शरिराचें मान काढिलें तों माझ्या एकट्याच्या शरिराबरोबर त्यांच्यांतील १७२४ असामींचीं शरिरें झालीं. यावरून त्यांनीं वर सांगितलेलें अनुमान काढिलें. ही गोष्ट मला तरी, पुढें मी दरबारांतील एका गृहस्थास विचारल्यावरून त्याचे मुखानें कळली. अस्तु, या गोष्टीवरून त्या बादशाहाची व्यवस्थितपणाची हातोटी आणि त्या एकंदर लोकांचें चातुर्य याविषयीं कोणासही आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं.

---

## प्रकरण ४.

मी बंधमुक्त झाल्यानंतर प्रथमतः बादशाहाची राजधानी जें मिल्डेंडो शहर तें पाहण्यास मला परवानगी मिळावी म्हणून बादशाहास अर्ज केला. माझा अर्ज लागलाच मंजूर झाला. परंतु शहरवासी लोकांस अगर त्यांचे घरांस वगैरे बिलकूल मजकडून इजा पोहोंचतां कामा नये अशी मला निक्षून आणखी निराळी ताकीद मिळाली. मी शहर पाहण्यास येणार अशाबद्दल तमाम लोकांस जाहिरनाम्याचे द्वारें वर्दी देण्यांत आली. शहराचा तट अडीच फूट उंच व सुमारें अकरा इंच रुंद असल्यामुळें त्यावरून घोडयांची गाडी खुशाल बिंफि-

कीर नेतां येते. आणखी त्याच्या भोंवतालीं दहा दहा फुटांच्या अंतरावर मजबूत किल्ले बांधिले आहेत. मी प्रथम पश्चिमेकडील मोठ्या वेशीवरून उडी मारून, आंत शिरून शहराचे जे दोन मुख्य व सर्वांत मोठे रस्ते, त्यांतून फार सावधगिरीनें हळू हळू फिरलों. अंगरख्याच्या घोळानें कदाचित् घरांच्या वळचणींची चालतांना खराबी होईल ह्मणून मी अंगरखा अंगांत न घालतां नुसती बंडीच घालून गेलों होतों. चालत असतां मी फारच खबरदारीनें खालीं पाहून पाऊल टाकीत असें; कारण, रस्त्यांतून बिलकूल कोणींही फिरूं नये, फिरल्यास त्याच्या जिवास धक्का पोहोंचेल तर त्याबद्दल सरकार तक्रार ऐकणार नाहीं व जबाबदार नाहीं, असा सक्तीचा जरी दांडोरा पिटला होता, तरी कदाचित् कोणी चुकून रस्त्यामध्यें राहील तर आपल्या पायांखालीं तुडविले जाऊं नये ह्मणून मीं याप्रमाणें काळजी घेतली होती. घराच्या शेवटील मजल्याच्या खिडक्यांतून आणि कौलारांवर मला पाहण्याकरितां लोकांची मनस्वीच गर्दी जमली होती; ती इतकी कीं, मी आजपर्यंत इतकीं शहरें फिरलों, पण असें दाट वस्तीचें शहर माझ्या पाहण्यांत कधींही आलें नाहीं असें मला वाटलें. शहर अगदीं [illegible] असून त्याच्या तटाची प्रत्येक बाजू पांचशें फूट लांब आहे. मागें जे दोन रस्ते सांगितले, ते नीट दोरीसूत गेले असून त्यांची रुंदी पांच फूट आहे; व ते एकमेकांस मधोमध दुभागून गेले असल्यामुळें त्या योगें शहराचे चार भाग झाले आहेत. लहान लहान बोळ व गल्ल्या यांमधून मला शिरतांच येईना, ह्मणून मीं जातांना त्या नुसत्या पाहिल्या. त्यावरून माझें असें अनुमान झालें कीं, त्यांची रुंदी १२ पासून १८ इंचपर्यंत असावी. एकंदर शहरांत ५,००,००० लोक राहतील यवढें तें मोठें आहे. घरें कांहीं तीन मजली, कांहीं चार मजली व कांहीं

पांच मजली आहेत. दुकानें पुष्कळ असून सर्व जिनसांचा व्यापार फार मोठा चालतो.

पूर्वी सांगितलेले दोन रस्ते ज्या ठिकाणीं एकमेकांस मिळतात त्या ठिकाणीं, म्हणजे शहराच्या अगदीं मध्यभागीं, राजवाडा आहे. त्याच्या सभोंवतीं दोन फूट उंचीचा तट असून त्याच्यांत व इमारतींत वीस फुटींचें अंतर आहे. ह्या तटावरून पलीकडे उडी मारून जाण्यास मला सरकारची परवानगी मिळाली होती. तट व वाडा ह्यांच्या दरम्यानची जागा वर सांगितल्याप्रमाणे रुंद [illegible] मला चोहों बाजूंकडून वाडा चांगला पहाण्यास सांपडला. एकंदर इमारतीचा चौफेर घेर चाळीस फूट औरसचौरस असून तिला तीन चौक होते. आंतील चौसोपींत सरकारच्या एकांताच्या बैठकीच्या जागा व रंगमहाल वगैरे होते, ते पाहण्याची मला फारच उत्कंठा झाली; पण कांहीं इलाज चालेना. कारण एका चौकांतून दुसऱ्या चौकांत जाण्यास जे अतिशय मोठे ह्मणून दरवाजे होते, ते सारे १८ इंच उंच व ७ इंच रुंद असे होते. आतां एक युक्ति होती. ती अशी कीं, प्रथम दरवाज्यावरील आढ्यावरून पलीकडे पाय टाकून पहिल्या चौकांत उतरावें, नंतर त्याच रीतीनें दुसऱ्या व तिसऱ्या चौकांत जावें. ही युक्ति तर खाशी होती, पण मध्यें एक अडचण आली. ती ही कीं, दरवाज्यावरचें आढें अगदीं नाहीं तरी जमिनीपासून पांच फूट उच असल्यामुळें कितीही शिताफीनें गेलें तरी इमारतीस धक्का [illegible]; कारण, जरी भिंती तोडीव दगडांच्या, बळकट व चार इंच रुंदीच्या अशा होत्या, तरी इतक्या उंचीवरून पलीकडे ढेंग टाकतांना माझा बराच भार त्यांवर पडला असता; आणि त्या योगानें कदाचित् कांहीं भलतेंच झाल्यास रिकामें लचांड पाठीशीं लागेल अशी मला भीति वाटली. तेव्हां त्या भरीसच पडूं नये असें मीं मनांत

आणिलें. परंतु बादशाहाचा फारच आग्रह पडला कीं, कसेंही करून आंतील नकशीचें काम, सामानसुमान व मजलशीचे थाट हे एकवार पाहिले पाहिजेत. तेव्हां मी आंत जाण्याची कांहीं सोईस्कर युक्ति योजून दोन तीन दिवसांनीं येतों असें बादशाहास विनयपूर्वक सांगून त्याची रजा घेतली. नंतर शहरापासून सुमारें १०० यार्डाच्या अंतरावर सरकारी बडा शिकारखाना आहे त्यांत जाऊन मीं आपल्या चाकूनें कांहीं मोठमोठी झाडें तोडिलीं; आणि दोन तीन दिवसांत, माझा भार सोसण्यासारख्या बळकट व सुमारें तीन फूट उंचीच्या अशा त्यांच्या दोन घडवंच्या तयार केल्या. लोकांना शहरांत फिरण्याच्या मनाईची पूर्वीप्रमाणें पुनः दवंडी देण्यांत आल्यावर मी आपल्या दोन्हीं घडवंच्या हातांत घेऊन पुनः पूर्ववत् राजवाड्यापाशीं आलों. नंतर त्यांपैकीं एक घडवंची सदरचे दरवाज्यापाशीं उभी करून दुसरी हातांत घेतली, आणि ती आढ्यावरून पलीकडे हळूच चौकांत उभी केली. मग एका घडवंचीवर एक पाय व दुसरीवर दुसरा ठेवून चौकांत सहज उतरून आलों, आणि बाहेरील घडवंची एका आंकडेदार काठीनें उचलून [illegible] घेतली. आणि ह्याच रीतीनें दुसऱ्या व तिसऱ्या चौकांत गेलों. नंतर आडवा पडून मीं आपलें तोंड दुसऱ्या मजल्याच्या खिडक्यांशीं लाविलें. त्या मी येणार म्हणून मुद्दामच उघडून ठेविल्या होत्या. असो, त्यांतून मीं बारीक नजरेनें आंत पाहिलें तों चोहोंकडे [illegible]नाप्रमाणें थाट नजरेस पडला. त्यांत विशेषत राणीसरकार व राजकन्या ज्या ऐनेमहालांत बसल्या होत्या, त्याची शोभा खरोखरच अवर्णनीय होती यांत संशय नाहीं. राणीसाहेबांनीं मजकडे कृपाकटाक्षानें पाहून हास्यवदन केलें, आणि मला चुंबन [illegible]ण्यासाठीं खिडकींतून आपला हात पुढें केला ( ह्या लोकांत असें करणें अतिशय सन्मानाचें सूचक समजतात. )

पुढें सुमारें आठ दहा दिवसांनीं रेल्ड्रेसल् ( खाजगी-कडील मुख्य कारभारी ) बरोबर फक्त एकच शिपाई घेऊन लगबगीनें मजकडे आला. त्यानें आपली गाडी किंचित् अंतरावर उभी करून, मला तुमचेपाशीं कांहीं बोलावयाचें आहे, त्यास एक तासभर फुरसत करून मी बोलतों ह्याकडे लक्ष द्यावें, अशी मला विनंति केली. मीं ती तत्काळ मान्य केली. कारण, तो पुरुष स्वतः गुणवान् व योग्य असून, मीं बंधमुक्त होण्याकरितां सरकारांत जे जे अर्ज वगैरे केले त्यांत त्यानें मला उत्तम साह्य केलें होतें. त्याचें बोलणें मला चांगलें ऐकूं येण्यासाठीं मी आडवा पडतो ह्मणून ह्मटलें; परंतु त्यानें आपणा स्वतःसच हातांत धरण्याविषयीं मला सांगितलें. त्याप्रमाणें मीं केल्यावर त्यांनें बोलण्यास सुरुवात केली. प्रथम त्यानें मा बंधमुक्त झाल्याबद्दल आनदप्रदर्शक असें कांहीं भाषण करून नंतर म्हटलें, " या कामांत कांहीं अंशीं यशाचा वांटा मजकडे येत आहे हें खरें, तथापि एकंदरीनें पाहतां हल्लीं राज्यावर कांहीं चमत्कारिक प्रसंग येऊन ठेपला आहे, याच कारणामुळें ही गोष्ट इतकी सत्वर घडून आली. पहा, हल्लीं आमची स्थिति जरी मोठी भरभराटीची आहे असें वरवर पाहणारास दिसतें, तरी अंतर्यामीं आम्ही एका मोठ्या गोष्टीच्या काळजीमुळें फार हवालदिल आहों. कारण तुह्मांस ठाऊकच आहे कीं, आज सुमारें चाळीस दिवस होत आले, ब्लेफुस्कू येथील लोकांशीं आमचा मोठा घोर युद्धप्रसंग चालला आहे. त्यांत उभय पक्षांकडील लोकांस जय अपजय बहुतकरून सारखेच. मिळत गेले आहेत. आमचीं ४० मोठमोठीं जहाजें व याहीपेक्षां अधि क लहान लहान तारवें शत्रूंच्या हातीं लागलीं. तसेच आमचे खलाशी आणि शिपाई मिळून तीस हजार लोक जखमी झाले व पडले. शत्रूंचें नुकसान

याहीपेक्षां कांहीं जास्ती झालें असावें असा अजमास आहे. तथापि हल्लीं आम्हांस मोठी काळजी उत्पन्न होण्याचें कारण असें कीं, तेथील बादशाहाचें एक फारच मोठें आरमार आमच्यावर चाल करून येण्याच्या बेतांत आहे; व तो घाला केव्हां एकाएकीं येऊन पडेल याचा कांहीं नेम नाहीं. यास्तव तुमचें अतुल बल आणि शौर्य मनांत आणून आमचे सरकारांनीं सदरील गोष्ट तुमचे कानावर घालण्यास मला हुकूम केला आहे. ”

याप्रमाणें त्याचें बोलणें झाल्यावर, मी बादशाहास नम्रतापूर्वक उलट निरोप पाठविला कीं, सरकारची होईल तितकी सेवा करण्याचें माझें कर्तव्यकर्म आहे; परंतु मजसारख्या परदेशी मनुष्यास अशा आपसांतील वादांत हात घालणें उचित दिसत नाहीं. तथापि शत्रूपासून सरकारचें राज्य व जिव सुरक्षित राखण्यास मी जिवानिशीं तयार आहें.

---

## प्रकरण ५.

ब्लेफुस्कूचें राज्य हें लिलिपटच्या ईशान्य दिशेकडे एका बेटांत वसलें आहे; व ह्या दोहोंच्या मध्यें ८०० यार्ड रुंदीची एक खाडी आहे. हा देश अद्यापपर्यंत माझ्या दृष्टीस पडला नव्हता; व मागें सांगितल्याप्रमाणें त्या लोकांचें आरमार या देशावर चाल करून येणार ही खबर मला कळल्यापासून त्यांचे जहाजांवरील लोकांस कदाचित् आपला सुगावा लागेल, या भीतीनें मीं तिकडील किनाऱ्यावर जाणें सोडून दिलें होतें. अद्यापि शत्रूकडील लोकांस मजविषयीं कांहींएक बातमी कळली नव्हती; कारण, लढाई सुरू झाल्यापासून ‘ उभय राष्ट्रांमधील हरएक प्रकारचा व्यवहार अगदीं बंद असे, व समुद्रांत कोणीं कसल्याही प्रकारचें जहाज टाकूं नये, व ह्या हुकुमाविरुद्ध जो कोणी वर्तन करील त्यास देहान्तशासन मिळेल, ’ अशाबद्दल आमच्या सरकारानें जाहिरनामे प्रसिद्ध केले होते. शत्रूचें सर्व आरमार

एकदम पकडण्याची जी मीं एक युक्ति योजिली होती ती बादशाहास निवेदन केली. तें आरमार, अनुकूल वारा सुट-तांक्षणींच निघण्याच्या कडेकोट तयारीनें बंदरांत नांगरून ठेविलें आहे, अशी आमच्या हेरांनीं खातरीपूर्वक बातमी सांगितली. खाडीची खोली किती असावी ह्याबद्दल मीं हुशार आणि अनुभवी अशा खलाशांपाशीं चौकशी केली; कारण त्यांनीं अनेक वेळां बुडीद टाकून पाहिलें होतें. ते म्हणाले, भरतीचे वेळीं मध्यभागीं ७० ग्लम्ग्लफ्ज् ( म्हणजे युरोपियन् मापाचे सुमारें ६ फूट ) खोली असते, व बाकीच्या ठिकाणीं फार झाली तर ५० ग्लम्ग्लफ्ज्, ह्यांहून जास्त नाहीं. मी ईशान्य दिशेकडे म्हणजे ब्लेफुस्कूचे समोरचे बाजूकडील किनाऱ्याकडे गेलों. तेथें एका टेंकडीच्या मागें आडवा पडून मीं आपली धाकटी दुर्बीण लावून शत्रूचें आरमार समग्र पाहिलें; तों तें नांगरलेलें असून त्यांत लढाऊ गलबतें ५० व उतारू लोक बसण्याचीं अनेक जहाजें माझ्या दृष्टीस पडलीं. नंतर मी घरीं आलों, आणि बरींच पुष्कळ चऱ्हाटें व लोखंडी गज मला आणून द्यावे, म्हणून हुकूम केला. ( कारण हल्लीं असा अधिकार मला मिळाला होता. ) मला त्यांनीं जीं चऱ्हाटें आणून दिलीं तीं सुतळीप्रमाणें जाड असून गज सळईइतके जाड व लांब असें होते. मीं त्यांपैकीं तीन तीन चऱ्हाटें घेऊन त्यांचे जाड तिपडी सोल तयार केले. तसेंच त्या गजांसही बळकटी येण्याकरितां ते तीनतीन एकत्र बांधून त्यांच्या दोन्ही बाजू वांकवून ते आंकड्यांसारखे केले; व ह्याप्रमाणें पन्नास एक आंकड्यांस तितकेच सोल गाठून टाकिले. हें सामान घेऊन मी पुनः पूर्वीं सांगितलेल्या किनाऱ्यावर गेलों आणि आपला अंगरखा, जोडा, व पायमोजे तेथें काढून ठेवून

चामड्याची बंडी अंगांत घालून भरती येण्यापूर्वीं सुमारें अर्धा तास खाडींत उतरलों. नंतर झाली तितकी जलदी करून पाण्यांतून चालतां आलें तितकें चाललों. पुढें मध्य-भागीं सुमारें तीस यार्डपावेतों पोहून गेल्यावर पुनः पायांस जमीन लागली. असो; खाडींत उतरल्यापासून सुमारें अर्ध्या तासाचे आंतच मी आरमाराजवळ येऊन दाखल झालों. शत्रूकडील लोक मला पाहून इतके भयचकित होऊन गेले कीं, जहाजांवरून भडाभड पाण्यांत उड्या टाकून ते कि-नाऱ्यावर गेले. त्या ठिकाणीं एकंदर अगदीं नाहीं तरी तीस हजारांहून कमी लोक नसावे. मग मीं आपल्या जवळचें सामान काढिलें, आणि दरएक जहाजाच्या पुढील बाजू-कडील भोकांत एक एक आंकडा अडकवून, त्यांस गाठ-लेल्या दोऱ्यांचे शेवट एकत्र बांधिले. हें मी करीत अ-सतां शत्रूकडील लोकांनीं हजारों बाण मजवर सोडिले. त्यांपैकीं कित्येक माझ्या हातांत आणि गालांत घुसले. त्यां-पासून मला पुष्कळ इजा झाली, व माझ्या कामांतही बराच अडथळा आला. त्यांत विशेषतः मला माझ्या डोळ्यांविषयी मोठी धास्ती पडली. आणि खरोखर, तितक्यांतच मला एक युक्ति सुचली म्हणून बरें झालें, नाहीं तर त्या दिवशीं माझे डोळे निखालसपणें जावयाचेच! मीं लागलाच आपला चष्मा काढून नाकावर गच्च आवळून टाकला. तेव्हां अर्थातच डो-ळ्यांविषयींची भीति दूर झाली. मग मीं शत्रूंच्या बाणांस न जुमानतां आपलें काम झपाट्यानें करण्यास सुरुवात केली. माझ्या चष्म्याच्या भिंगास पुष्कळ बाण लागले, पण त्यांच्या योगानें फक्त तो किंचित् हालला, ह्याखेरीज कांहींएक झालें नाहीं. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें मीं सर्व कड्या जहाजांस अड-कविल्याच होत्या. आतां त्यांच्या दोऱ्यांची गांठ धरून

मीं ओढण्यास आरंभ केला. परंतु एकही जहाज हालेना; कारण तीं नांगरांस पक्कीं बांधून टाकिलीं होतीं. तेव्हां मला शेवटचा इलाज करणें प्राप्त झालें. मीं दोऱ्या सोडून दिल्या आणि जहाजांस आंकडे अडकाविले होते तेही तसेच राहूं दिले, आणि तीं जहाजें ज्या दोऱ्यांनीं नांगरांस बांधिलेलीं होतीं, त्या झपाट्यानें सपासप चाकूनें कापून काढिल्या. नंतर त्या जहाजांस अडकविलेल्या कड्यांस ज्या दोऱ्या बांधिल्या होत्या, त्या हातांत धरून शत्रूचीं ५० लढाऊ जहाजें खुशाल ओढीत चाललों !

ब्लेफुस्कूच्या लोकांस माझ्या मनांतील बेत पहिल्यानें अगदीं समजला नव्हता, यामुळ त्यांस माझें तें एकंदर कृत्य पाहून फक्त आश्चर्यच वाटलें होतें; व जेव्हां मीं जहाजांच्या दोऱ्या तोडण्यास आरंभ केला, तेव्हां त्यांस इतकें मात्र वाटलें कीं माझा बेत समुद्रांत जहाजें चोहोंकडे वाहवत लावण्याचा अथवा एकमेकांवर आपटविण्याचा असावा. परंतु जेव्हां सबंध आरमारचें आरमार मी ओढीत चाललों हें त्यांनीं पाहिलें, तेव्हां त्यांनीं दुःखाच्या व निराशेच्या आरोळ्या मारून एवढा मोठा गोंगाट केला कीं तो सांगतां पुरवत नाहीं ! पुढें कांहीं वेळानें मला शत्रूंची भीति नाहींशी झाल्यावर मी अंमळसा थांबलों, आणि हातांत व गालांत जे कांहीं बाण रुतले होते ते काढून टाकून, त्या जाग्यावर लिलिपटियन लोकांनीं जो एक प्रकारचा दवा लावण्यास दिला होता तो चोळला. नंतर मीं आपला चष्मा काढून घेतला, व खाडीस किंचित् ओहटी येण्याची वाट पहात दोन घटका तेथेंच उभा राहिलों; आणि मग तें जहाजांचें लटांबर ओढीत ओढीत पाण्यांतून चालत चालतच इकडील बंदरीं सुरक्षित येऊन दाखल झालों.

बादशाहा आणि त्याचे दरबारचे झाडून सारे लोक ह्या

भगीरथ प्रयत्नाचा परिणाम काय होतो तो पहाण्यासाठीं किनाऱ्यावर येऊन उभे राहिले होते. तीं एकंदर जहाजें अर्धचंद्राकृति तिकडून इकडे येतांना त्यांच्या दृष्टीस पडलीं; परंतु मी छातीइतका पाण्यांत असल्याकारणानें मला त्यांस नीट न्याहाळतां आलें नाहीं. जेव्हां मी खाडीच्या मध्यास येऊन पोहोंचलों, तेव्हां तर ते अगदीं घाबरून गेले, कारण त्या वेळीं पाणी माझ्या गळ्यास लागलें होतें. बादशाहाचा असा तर्क झाला कीं हा समुद्रांत बुडाला, व हें जें आरमार येत आहे, तें हल्ला करण्याकरितां शत्रूच घेऊन येत आहेत. परंतु त्याच्या मनांतील भीति लवकरच नाहींशी झाली. कारण जसजसा मी पुढें येऊं लागलों, तसतशी खाडीची खोली अर्थात् कमी होऊं लागली; आणि लवकरच माझा आवाज त्यांस ऐकूं येई इतका मी जवळ आलों. मग ती आरमारास बांधिलेली दोरी हातांत, व तें आरमार पाठीमागून येत आहे, अशा थाटांत मीं 'लिलिपटच्या महापराक्रमी महाराजांचा जयजयकार असो' असा मोठ्यानें शब्द केला. तेव्हां त्या सर्वांच्या आनंदास पारावार नाहींसा झाला. मी जमिनीवर पाऊल टाकतांच बादशाहानें माझा पराकाष्ठेचा सन्मान आणि स्तुति करून, लागलीच तेथच्या तेथें मला 'नार्डाक' म्हणजे पहिल्या प्रतीची मानकरी ही पदवी दिली.

हें झाल्यावर बादशाहानें मला सांगितलं कीं, पुनः अशीच एकादी संधी पाहून शत्रूचीं बाकी राहिलेलीं जहाजेंही आपल्या बंदरांत घेऊन यावीं. खरोखर, राजे लोकांच्या महत्त्वाकांक्षेस मर्यादाच नाहीं असें ह्मटलें पाहिजे; कारण बादशाहाचा उद्देश एकंदरीन असा दिसला कीं, ब्लेफुस्कूचें सगळें राज्यचें राज्य खालसा करून तेथें आपला एक हस्तक नेमावा, व आपण एकट्यानें सर्व पृथ्वीचें सार्वभौमत्व भोगावें. परंतु असें करणें हें

राजनीति आणि न्याय यांस संमत नाहीं, म्हणून गैरवाजवी आहे, असें बादशाहास बहुत प्रकारें सांगून मीं वरील गोष्टीपासून त्याचें मन फिरविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. आणि शेवटीं असें साफ सांगितलें कीं, अशा शूर आणि स्वतंत्र लोकांस दुसऱ्याचे दास करावयास मी कधींही कारणीभूत होणार नाहीं; व ह्या प्रकरणाविषयीं जेव्हां दरबारांत वादविवाद झाला, तेव्हां देखील त्यांत जे विचारी लोक होते त्यांचेंही मत माझ्याप्रमाणेंच पडलें.

वर सांगितलेलें माझें स्पष्ट आणि धिटाईचें बोलणें बादशाहाच्या युक्तींस आणि कारस्थानांस अगदीं प्रतिकूळ असल्यामुळें त्याची मजविषयीं पराकाष्ठेची खपा मर्जी झाली. त्यानें ही गोष्ट दरबारांत मोठ्या हिकमतीनें बनवून सांगितली, तरी तेथेंही जे चार शहाणे होते ते या प्रकरणीं कांहीं न बोलतां अगदीं उदासीन राहिले. यावरून त्यांचेही मत माझ्याप्रमाणेंच होतेंसें दिसलें. परंतु दुसरे जे कित्येक मला पाण्यांत पहात होते, त्यांस बोलल्यावांचून राहवेना. त्यांनीं कित्येक गोष्टी मोघम बोलून दाखविल्या. तरी त्यांचा रोंख पूर्णपणें मजकडेच होता; व या वेळेपासूनच, माझ्याविरुद्ध जें प्रधानमंडळ होतें तें व बादशाहा यांच्यांत माझ्याबद्दल नेहमीं खलबतें सुरू होऊन त्यांनीं मजवर एक कचाट रचलें. तें दोन महिन्यांच्या आंतच उघडकीस आलें. त्याच्या योगानें माझा सर्वस्वी नाश होण्याचा रंग आला होता. सारांश, राजे लोकांची सेवा प्राण जाई तोंपर्यंत जरी केली, तरी एखादे वेळीं त्यांचा छंद पुरविण्यांत का कसूर झाली, कीं लागलेंच पूर्वींचें सर्व करून नाहींसारखें होतें !

अस्तु; मागें सांगितलेला कार्यभाग आटोपल्यानंतर सुमारें तीन वारांनीं ब्लेफुस्कूचे बादशाहाकडून तहाचें बोलणें करण्याकरितां कांहीं वकील मंडळी आली व लवकरच उभय राष्ट्रांमध्यें

तह ठरला. त्यांतील सर्व बाबी मी आतां सांगत बसत नाहीं; तरी इतकें सांगणें अवश्य आहे कीं, त्यांतील बहुतेक अटी आमच्या बादशाहास अनुकूल होत्या. तिकडून एकंदर सहाजण वकील आले होते, व त्यांजबरोबर आणखी पांचशें लोक होते. ते दरबारांत आले तेव्हां त्यांचा थाट त्यांच्या धन्याच्या थोरवीस व कामाच्या महत्वास अनुरूप असा होता. तहाचें काम चाललें असतां दरबारांत माझी साख असल्यानें ( निदान होती असें मला वाटत होतें ) मी पुष्कळ तऱ्हेनें त्यांच्या उपयोगीं पडलों, व तुमच्याशीं माझा पूर्ण स्नेहभाव आहे असें त्यांस खाजगी नात्यानें सांगितलें. ह्या एकंदर कारणांवरून त्यांचें तहाचें काम संपल्यावर एके दिवशी ते मोठ्या समारंभानें माझ्या भेटीस आले. प्रथमतः त्यांनीं माझें शौर्य व औदार्य यांविषयीं स्तुतिपर भाषण करून, नंतर आपला धनी जो बादशाहा त्याच्या तर्फेनें मला आपल्या देशास येण्याविषयीं पाचारण केलें; व माझ्या अतुल बलाविषयीं त्यांनीं ज्या कांहीं अद्भुत गोष्टी ऐकिल्या होत्या त्यांचा प्रत्यय पाहण्याची त्यांनीं आपली इच्छा दर्शविल्यावरून मीं तत्काळ त्यांस कित्येक चमत्कार दाखविले; परंतु वाचकांस कंटाळा येईल यास्तव त्यांचें मी येथें सविस्तर वर्णन करीत नाहीं.

याप्रमाणें कांहीं वेळ मीं त्यांना करमणूक केली. तेणेंकरून त्यांस परम आश्चर्य आणि संतोष वाटला. हें झाल्यावर मीं त्यांस सांगितलें कीं, आपण कृपा करून आपले धनी जे बादशाहा, ज्यांच्या सद्गुणरूपसुमनांच्या सुवासानें सर्व जगास आनंद आणि आश्चर्य वाटत आहे, त्यांच्या चरणीं माझा परमनम्रभावपूर्वक प्रणिपात प्रविष्ट करून विदित करावें कीं, मीं स्वदेशीं जाण्यापूर्वी महाराजांचें एकवार दर्शन घेण्याचा निश्चय केला आहे. मग एके दिवशीं आमचे बादशाहाची

मीं भेट घेतली, आणि विनंति केली कीं, मला फ्लेफुस्कू येथील बादशाहाचे मुलखांत एकवार जाण्याची इच्छा आहे, त्यास महाराजांनीं कृपावंत होऊन परवानगी द्यावी. त्यानें परवानगी दिली खरी, परंतु ती गोष्ट एकंदरीनें त्यास रुचली नाहीं असें मला दिसलें; तथापि याचें कारण काय असावें याची मला कल्पना करतां येईना. कारण मला छक्केपंजे अगदीं माहीत नव्हते! इतक्यांत कोणी एक गृहस्थ कुजबुजला कीं, " त्या वकील मंडळीशीं पर्वतेश्वर यानें संबंध ठेविला या गोष्टीमुळें फ्लिम्नॅप आणि बोल्गोलम यांस वैषम्य वाटून त्यांनी बादशाहाचे कान फुंकले आहेत. " यावरून राजदरबारांतील डावपेंच म्हणून जे कांहीं म्हणतात त्यांची कांहींशी कल्पना माझ्या मनांत आली.

आतां ही एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, युरोपखंडांतील कोणत्याही दोन राष्ट्रांच्या परस्परांच्या भाषेंत जितका भेद दृष्टीस पडतो, तितकाच या उभय राष्ट्रांच्या भाषांत असून, उभयतांसही आपापली भाषा प्राचीन, सुंदर व जोरदार असल्याविषयीं मोठा अभिमान आहे; तसेंच तीं एकमेकांच्या भाषेचा उघडपणें धिक्कार करितात, व ह्या कारणास्तव फ्लेफुस्कू येथील वकील मंडळींनीं माझ्याशीं बोलण्याकरितां एका दुभाष्याची योजना केली होती. तथापि त्यांचें आरमार धरून आणल्या कारणानें त्यांजवर आमचे बादशाहाचा वरचढपणा झाला होता; यास्तव तहाच्या संबंधानें भाषणें व कागदपत्र वगैरे जे झाले, ते सर्व आमच्या बादशाहानें त्या वकिलांस लिलिपटच्या भाषेंत तयार करण्यास लाविलें; पण आणखी हीही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, त्या दोन्ही राष्ट्रांमधील व्यापारधंद्याच्या वगैरे संबंधानें दळणवळण, तसेच एकमेकांच्या चालीरीति समजून घेऊन व एकंदरीनें जगाची माहिती क-

रून घेऊन आपापली सुधारणा करण्याकरितां अमीरउमरावांचीं व श्रीमंत गृहस्थांचीं मुलें एका देशांतून दुसऱ्या देशांत पाठविण्याची चाल, इत्यादि गोष्टींमुळें बहुतकरून प्रतिष्ठित लोक, त्याचप्रमाणें व्यापारी, दर्यावर्दी, व त्यांतही एकंदरीनें जे समुद्रतीरच्या प्रदेशांत राहतात अशा लोकांस दोन्ही भाषा येत असतात. ही गोष्ट, पुढें कांहीं दिवसांनीं जेव्हां मी ब्लेफुस्कूचे राजाचे भेटीस गेलों तेव्हां माझ्या लक्षांत आली. ह्या ब्लेफुस्कूच्या सफरीमध्यें, जरी माझ्या शत्रूंच्या अदावतीमुळें मजवर मोठमोठीं संकटें येऊन गुदरलीं, तरी ईश्वरकृपेनें त्यांतून मी पार पडून सुख पावलों. ही हकीकत पुढें यथास्थळीं येईल.

---

## प्रकरण ६.

आतां लिलिपटच्या राज्याचें सविस्तर वर्णन जरी दुसऱ्या एका ठिकाणीं करण्याचा माझा इरादा आहे, तरी तूर्त जिज्ञासु वाचकांस त्याची सामान्य माहिती होण्यासाठीं त्यांतील मुख्य मुख्य गोष्टी येथें सांगतो. तेथील रहिवाशांच्या शरिराचें आकारमान साधारणपणें सहा इंचांच्या आंत असतें हें पूर्वी सांगण्यांत आलेंच आहे. याचप्रमाणें बाकीचे प्राणी व झाडेंझुडें ह्यांचें समजावें. उदाहरण, घोडे व बैल ह्याची उंची फार फार म्हटली म्हणजे चारपांसून पांच इंचांपर्यंत, व मेंढरांची दीड इंचाच्या आंत बाहेर असते. तसेंच हंस पक्षी ध्या. तो आपल्या इकडील चिमणीयेवढा सरासरी असेल नसेल. हाच क्रम शेवटपर्यंत म्हणजे अगदीं लहान प्राण्यापर्यंत लक्षांत आणावा. हे तर इतके सूक्ष्म आहेत कीं, मला ते डोळ्यांनीं दिसण्याची देखील पंचाईत पडे ! परंतु लिलिपटियन् लोकांस त्यांच्या दृष्ट्यनुरूप सूक्ष्म पदार्थ पाहण्यासारखे डोळे ईश्वरानें दिले आहेत. त्यांची दृष्टि जवळच्या

पदार्थांवर अगदीं नेमकी पोहोंचते, तशी पण दूरच्यांवर पोहोंचत नाहीं. जवळचे पदार्थ त्यांच्या नजरेंत किती जलद येतात हें पाहून मला मोठी मौज वाटे. एके दिवशीं एक बुटलेर एक कुक्कुडकुंभा धरून फाडीत होता, तो साधारण माशीएवढा देखील नव्हता; व एक पोरगी एका सुईंत रेशीम ओंवीत होती, तें रेशीम आणि ती सुई हीं दोन्ही मला दिसलीं नाहींत ! सरकारच्या बड्या शिकारखान्यांत कित्येक अतिशय मोठीं झाडें आहेत तीं सुमारें सात फूट उंच आहेत; व ही त्या देशांतील झाडांच्या उंचीची पराकाष्ठा होय. वर सांगितलेल्या झाडांच्या शेंड्याला माझा हात सहज पुरत असे. यावरून बाकीच्या वनस्पति वगैरेविषयीं वाचकांनीं कल्पना करावी.

ह्या लोकांच्या विद्येविषयीं मला फारसें कांहीं सांगणें नाहीं. फक्त इतकेंच सांगतों कीं, तिला आज हजारों वर्षांपासून चढती कळा लागली असून सांप्रतकाळीं तर ती भरभराटीच्या केवळ शिखरास पोहोचली आहे. परंतु त्यांची लिहिण्याची पद्धति कांहीं चमत्कारिक तऱ्हेची आहे; म्हणजे युरोपियन लोकांप्रमाणें डावीकडून उजवीकडे, अथवा अरब लोकांप्रमाणें उजवीकडून डावीकडे, अथवा चिनी लोकांप्रमाणें वरून खाली, अशी नसून तिरकस म्हणजे इंग्लंडांत ज्याप्रमाणें स्त्रिया कागदाच्या एका कोंपऱ्यापासून दुसऱ्या कोंपऱ्यापर्यंत लिहितात, त्याप्रमाणे आहे.

ह्या राष्ट्राचे कित्येक कायदे व रीतिभाति कांहीं विशेष प्रकारच्या आहेत; व त्या जर केवळ उघडपणें माझ्या प्रिय देशाच्या विरुद्ध नसत्या, तर त्यांच्या रास्तपणाबद्दल मीं पुष्कळच चर्चा केली असती; पण तसा प्रकार नसल्यामुळें मी त्यांविषयीं फक्त चार शब्द लिहून आटपतों.

दगलबाजी हा चोरीपेक्षां मोठा गुन्हा आहे असें ते

लोक मानतात. यास्तव तो गुन्हा करणारास देहान्तशिक्षाच बहुतकरून मिळते. त्यांचें ह्मणणें असें कीं, अगदीं साधारण बुद्धीचा जरी मनुष्य असला, तरी त्यास आपली मालमत्ता चोरापासून सुरक्षित राखण्यास काळजी व सावधगिरी त्याच्या अंगीं असली म्हणजे पुरे आहे. परंतु धूर्त व लबाड मनुष्याच्या कावेबाजपणापुढें साळयाभोळ्या प्रामाणिक मनुष्याचें कांहीं चालत नाहीं. आतां परस्परांमधील उधारपाधारीचा धंदा, विकत घेणें व देणें, व इतर हरएक प्रकारची देवघेव, हें रहाटगाडगें तर सतत चाललें पाहिजे, त्यावांचून गत्यंतर नाहीं; व अशा गोष्टींत दगलबाजी हरघडी होण्याचा संभव; तेव्हां याबद्दल डोळेझांक केली अथवा कायद्याचा कांहीं धरबंद नसला म्हणजे प्रामाणिक रीतीनें चालणारा मनुष्य सफाई बुडतो, आणि लबाडाची तुंबडी भरते. एकदां असें झालें कीं, एका गृहस्थानें आपल्या नोकरापाशीं एक मोठ्या रकमेची हुंडीचिटी देऊन तिचा पैसा आणण्यास त्यास सांगितलें होतें. तो नोकर सदरहू पैसा घेऊन फरारी झाला. पुढें कांहीं दिवसांनीं त्यास पकडून आणल्यावर त्याजवर खटला सुरू असतां मीं त्याच्या तर्फेनें बादशाहापाशीं रदबदली केली कीं, हा केवळ विश्वासघात आहे, तेव्हां यास कांहीं कमी शिक्षा असावी. बादशाहास माझें बोलणें फारच विलक्षण वाटलें. तो म्हणाला, "या मनुष्याचा जो महान् अपराध तोच तुह्मी त्याच्या बचावाकरितां पुढें आणितां याचें मला मोठें नवल वाटतें !" तेव्हां खरोखर मी निरुत्तर झाल्यासारखा झालों. मग आपलें कांहीं तरी बोलावें म्हणून बोललों कीं, "प्रत्येक राष्ट्राचे रीतरिवाज व कायदेकानू भिन्न असतात." पण वास्तविक पहातां मी त्या वेळेस अगदीं ओशाळा होऊन गेलों !

राज्यनियमनाचीं मुख्य दोन अंगें; एक अनुग्रह आणि

दुसरा निग्रह, असें लोक नेहमीं ह्मणत असतात. पण या ह्मणण्याप्रमाणें चालणारें राष्ट्र फक्त हें येवढेंच माझ्या पाहण्यांत आलें. येथें असा नियम आहे कीं, जर कोणी मनुष्य, मीं आपल्या देशाच्या कायदेकानूंस पूर्णपणें अनुसरून एकसारखें सतत ७३ महिनेपर्यंत वर्तन केलें असा सबळ पुरावा करील, तर त्यास त्याच्या गुणांच्या व स्थितीच्या मानानें कांहीं विशेष प्रकारचे हक्क व त्याच बेतानें कांहीं पैशाचीही रक्कम मिळते. याकरितां कांहीं पैसा निराळाच राखून ठेविलेला असतो. तसेंच सदर्हू मनुष्यास 'स्निल्पाल्' ह्मणजे 'कायद्यास अनुसरून वागणारा' असा किताब मिळून तो त्याच्या नांवास जोडितात. पण हा किताब त्याच्या वंशजांस पुढें चालत नाहीं. मीं जेव्हां त्या लोकांस सांगितलें कीं, आमच्या देशांतील कायदे फक्त शिक्षेच्या संबंधानें अमलांत येतात, बक्षीस वगैरेचा प्रकार त्यांत कांहीं नाहीं, तेव्हां तुमच्या राज्यरीतींत हा फारच मोठा दोष होय, असें त्यांनीं बोलून दाखविलें. आणि याच कारणास्तव, त्यांच्या न्यायसभेंत न्यायदेवतेची जी मूर्ति बसविलेली असते तिला सहा डोळे असतात; ह्मणजे दोन पुढें, दोन मागें, व दोहों बाजूंस दोन; अशाकरितां कीं, तिची चोहोंकडे सारखी नजर आहे असें सर्वांनीं समजावें. तसेंच तिच्या उजव्या हातांत एक पैशाची मोकळी थैली असून डाव्या हातांत म्यानांत घातलेली तरवार आहे; व यांत तिचा हेतु बक्षीस देण्याचा विशेष, व शिक्षा करण्याचा कमी, असें दर्शविलें आहे.

सरकारी नोकरीकरितां कोणा मनुष्याची निवड करणें झाल्यास त्याच्या हुशारीपेक्षां नीति-अनीतीचा विचार ते लोक फार पहातात. त्यांचें मत असें आहे कीं, मनुष्यमात्रास नियमन हें आवश्यक आहे हें तर खरेंच, तथापि साधारण बुद्धी-

च्या मनुष्यास कोणता ना कोणता अधिकार चालविणें कांहीं अशक्य नाहीं, व लोकनियमनाची व्यवस्था हें एक गूढ करून त्याची किल्ली कांहीं अलौकिक बुद्धीच्याच मनुष्यांच्या हातांत ठेवावी असा ईश्वरी संकेत मुळींच नाहीं; व तसे पुरुष एका युगांत तीन देखील निपजण्याची मारामार. आणखी त्यांचें असें ह्मणणें कीं, प्रामाणिकपणा, नीति व नियमितपणा वगैरे अंगीं राखणें हे प्रत्येक व्यक्तिमात्राच्या आटोक्यांतील काम आहे; व हे गुण अंगीं असून अनुभव आणि सदुद्देश हे मनुष्याच्या ठायीं वास करीत असले ह्मणजे तो, ज्या काही कामांस व्यासंगाची जरूरच आहे ती खेरीज करून बाकीचीं सर्व कामें खुशाल चालवूं शकेल. तथापि एकंदरीनें त्यांच्या मनाचा ग्रह हा कीं, मनुष्य जेवढा ह्मणून लोकविलक्षण बुद्धीचा, त्याच्या अंगीं सदाचरणाचा अभाव असावयाचाच; व यास्तव अशा बुद्धिमान् पुरुषाच्या हातांत एकादा अधिकार देणें ह्मणजे मोठें धोक्याचें काम आहे; निदान इतकें तरी खरें कीं, मनुष्याच्या मनांत सद्धेतु असून अज्ञानामुळें जरी त्याच्या हातून चुकी झाली, तरी तिचा परिणाम येवढा लोकहितास बाधक होण्यासारखा भयंकर होत नाही. परंतु ज्याच्या मनाचा कलच मुळीं दुराचरणाकडे असून अनेक प्रकारच्या लबाड्या करण्यांत व त्या पचविण्यांत ज्याचा हातखंडा, अशा पुरुषाचीं कृत्यें फारच अनर्थकारक होतात !

वर जें कांहीं मीं त्या लोकांच्या कायदेकानूंविषयीं सांगितलें व पुढें सांगणार, त्याबद्दल वाचकांस असें सुचविणें जरूर आहे कीं, हें सर्व मीं त्या राष्ट्राच्या मूळारंभींच्या नियमांस अनुलक्षून सांगितलें. परंतु त्यांच्या विद्यमान स्थितीकडे लक्ष दिलें तर असें दिसून येईल कीं, मनुष्यजातीच्या नीच स्वभावास अनुसरून त्याच्यांतही पुष्कळ

लज्जास्पद व निंद्य प्रकारच्या गोष्टी चालू आहेत. उदाहरण, मोठी नोकरी, प्रतिष्ठा, अथवा राजाची मर्जी ही संपादण्याकरितां दोऱ्यांवरून नाचणें, [illegible] उड्या मारणें, वगैरे पाजीपणाचे प्रकार जे मागें सांगण्यांत आले, ते मूळचे नसून अगदीं अलीकडचे, ह्मणजे हल्लींच्या बादशाहाच्या आज्याचे वेळेपासून सुरू झाले; व तेव्हांपासून उत्तरोत्तर लोकांतील दुफळी व तट हे वृद्धिंगत होऊन त्यांच्या योगानें वरील गोष्टींस उत्तेजनच मिळत गेलें; व त्यामुळें त्या इतक्या शिखरास जाऊन पोहोंचल्या आहेत.

असो; त्या लोकांच्या कायद्यांत कृतघ्नपणाच्या गुन्ह्यासही देहान्तशिक्षा सांगितली आहे. कारण, ते असें ह्मणतात कीं, जो मनुष्य आपल्या उपकारकर्त्याशीही प्रतारणा करितो, तो इतरांचा, ह्मणजे ज्यांकडून त्याजवर उपकार घडले नाहींत त्यांचा तर अर्थात् शत्रुच होय; तेव्हां असा मनुष्य जिवंत राहण्यास योग्य नाहीं.

आईबापांच्या व मुलांच्या [illegible] त्या लोकांचीं जीं मतें आहेत, तीं आपल्याहून अतिशयच भिन्न आहेत. ते असें ह्मणतात कीं, मुलांच्या विद्याभासाविषयीं व पालन[illegible] आईबापांनीं व्यवस्था पहाणें हा अगदीं शेवटचा उपाय आहे. यास्तव प्रत्येक मोठमोठ्या गांवांत व शहरांत बालसंगोपनगृहें, म्हणजे जेथें मुलांची घराप्रमाणें सर्व व्यवस्था ठेवण्यांत येऊन त्यांच्या विद्याभ्यासाचीही सोय केलेली असते अशा शाळा स्थापल्या आहेत. या ठिकाणीं मोलमजूरी करून निर्वाह करणारे व खेड्यापाड्यांतील अगदीं गरीब लोक शिवाय करून बाकीच्या सर्वांनीं आपापले मुलगे व मुली पाठविल्या पाहिजेत असा नियम आहे. त्यांची शिक्षण व संगोपन यांच्या संबंधानें सर्व व्यवस्था तेथें राहते. मूल वीस

महिन्यांचें झालें ह्मणजे त्यास कांहींसें समजूं लागतें अशी त्यांची समजूत आहे. त्याप्रमाणें तितक्या वयाचें तें झालें ह्मणजे सदरील शाळेंत त्यास पाठवितात. या शाळा मुलांच्या व मुलींच्या वेगळ्या असून प्रत्येक पदवीच्या लोकांच्या योग्यते-प्रमाणे त्यांच्या मुलांची सोय राहण्यासाठी त्यांच्या निरनिराळ्या



मुलांच्या संगोपनाचें व शिक्षणाचें गृह ( शाळा ).

प्रती केलेल्या असतात. त्यांत, प्रत्येक मुलाच्या आईबापांची पदवी व त्यांची स्वतःची बुद्धि व मनाचा कल जसा असेल, त्याप्रमाणें पुढील संसारस्थितीचें त्यास शिक्षण देण्यांत हुशार अशा शिक्षकांची योजना केलेली असते. या शाळांची फी कसोशीनें होईल तितकी कमी ठेविलेली असते.

जे लोक साधारण गरीब असतात, त्यांस आपल्या मुलांचा शाळेचा खर्च चालवून खेरीज महिन्याच्या कांठीं आपल्या मिळकतीपैकीं थोडा अंश मुलांकरितां राखून ठेवावा लागतो. तेव्हां अर्थात् उधळेपणानें खर्च करण्याची लोकांस कायद्यानें मनाई झालेली आहे. कारण, लिलिपटियन् लोकांचें असे मत आहे कीं, लोकांनी आपली स्वतःची इच्छा तृप्त करण्याकरितां जगांत संतति उत्पन्न करावी, आणि नंतर तीस पोसण्याचें ओझें इतरांवर टाकावें, यासारखा दुसरा कोणताच अन्याय नाहीं.

या देशांत मी एकंदर नऊ महिने तेरा दिवस राहिलों. तेथें मीं आपल्याला राहण्याची सोय कशी केली होती, व माझ्या घरांत चाकरमाणसें वगैरे कोणकोणत्या कामांस किती होतीं, याबद्दलची हकीकत या स्थळीं जिज्ञासु वाचकांच्या मनोरंजनार्थ देतों. प्रथमतः खुर्ची व टेबल यांवांचून माझें फार अडूं लागलें. आतां गरज पडली म्हणजे युक्तिही सुचतेच; तशांत मला शिल्पकामाचीही किंचित् माहिती होती. तेव्हां मीं सरकारी शिकारगाहांतून कांहीं मोठमोठीं झाडें तोडून त्यांची लहानशी एक खुर्ची व टेबल तयार केलें. माझ्या बिछान्याकरितां पलंगपोस व टेबलावर घालण्याकरितां कपडा व अंगांत घालण्याकरितां कमीज हीं तयार करण्याकरितां २०० शिंपी लाविले होते. हीं सर्व त्यांनीं आपल्याकडून अतिशय जाड व खरखरीत कापड पाहून त्यार्ची केलीं; तरी त्यांना त्याच्या कित्येक घड्या एकावर एक घालून गोदडीसारखे ते कपडे तयार करावे लागले, तेव्हां ते सरासरी माझ्या उपयोगीं पडण्यासारखे झाले. कारण तेथलें अतिशय जाड कापड ह्मटलें म्हणजे आपलेकडील मलमलीपेक्षांही बारीक असतें. तेथील कापड साधारणपणें दोन इंच रुंद असून ताग्याची लांबी तीन फूट असते. माझा कमीज बेतावयाकरितां मी आडवा पडलों असतां एक शिंपी माझ्या

मानेवर व दुसरा गुडघ्यावर उभा राहून त्या दोघांनीं एक बळकट दोरी आपल्या हातांत धरिली, व तिसऱ्यानें एक इंच लांबीची आंखणी घेऊन ती दोरी मोजली. नंतर त्यांनीं माझ्या आंगठ्याचें मेज घेतलें. यापुढें माझ्याशीं त्यांना कांहीं कारण उरलें नाहीं. कारण त्यांनीं गणिताच्या योगानें बाकीचीं प्रमाणें तेव्हांच काढलीं. म्हणजे आंगठ्याच्या दुपटीनें मनगट, व त्याचप्रमाणें मान व कंबर यांचेंही प्रमाण त्यांनीं बसविलें. खेरीज माझा जुना कमीज होता तोही मीं त्यांस नमुन्याकरितां दाखविला, तेव्हां त्यांनीं अगदीं बरोबर मेळ बसविला. माझ्या अंगावरचे दुसरे कपडे तयार करण्याकरितां ३०० शिंपी लागले होते. परंतु त्यांनीं मेज घेण्याची युक्ति वरीलपेक्षां निराळी काढिली. मला गुडघे टेंकण्यास सांगून त्यांनीं माझ्या मानेला एक शिडी लाविली. ह्या शिडीवर एकजण चढला आणि त्यानें माझ्या गळपट्ट्यापासून जमिनीपर्यंत एक दोर टाकला. ही माझ्या आंगरख्याची लांबी झाली. आतां राहिलें हातांचें आणि कंबरेचें मेज. तें मींच आपल्या हातानें घेऊन दिलें. हा सर्व कपडा माझ्याच घरांत त्यांनीं तयार केला. कारण, तेथील अतिशय मोठ्या इमारतींतही तो मावण्याची पंचाइत झाली असती. हे कपडे, इंग्लंडांत ज्याप्रमाणें बायका गोदड्या शिवतात तसे दिसत होते. फरक इतकाच कीं, हे सर्व एकरंगी होते.

माझ्या स्वयंपाकाकडे ३०० आचाऱ्यांची नेमणूक केली होती, व त्यांना माझ्या घराच्या आसपासच झोंपड्या बांधून दिल्या होत्या. तेथें ते आपल्या मुलांमाणसांसह येऊन राहिले होते. प्रत्येकजण दोन दोन ताटें भरून अन्न तयार करी. मी वीस वाढप्यांस आपल्या हातांत घेऊन टेबलावर ठेवीं, व शंभरएक असामी खालीं जमिनीवर उभे रहात. त्यांपैकीं कांहींच्या हातांत अन्नाचीं ताटें व कांहींच्या

खांद्यावर दारूच्या पिपांच्या कावडी असत. यांपैकीं जसजसें जें जें मला लागे तसतसें तें तें टेबलावरील वाढपी मोठ्या चतुराईनें ( ज्याप्रमाणें आपण आडांतून घागर ओढून काढतों त्याप्रमाणें ) दोरांच्या योगानें वर ओढून घेत. त्यांनीं ताटभर अन्न वाढिलें म्हणजे माझा एक चांगला घांस होई, व पीपभर पाण्याचा एक साधारण घोट होई.

एके दिवशीं बादशाहास माझ्या खाण्यापिण्याची व्यवस्था व बेतबात कसा असतो याविषयींची हकीकत कळल्यावरून त्यानें मला सांगून पाठविलें कीं, 'आज आमची मर्जी आमच्या राणीसाहेब मुलें ह्यांसह तुमचे पंक्तीस भोजन करण्याची आहे.' त्याप्रमाणें कांहीं वेळानें ती मंडळी येऊन दाखल झाल्यावर मी त्यांस ---- :... . टेबलावर सुंदर खुर्च्यांवर बसवून त्यांच्या हुजऱ्यांस त्यांच्या शेजारीं उभें केलें. तेथें क्लिम्नॅप् ( मुख्य खजानजी ) हाही आपल्या शुभ्र पोषाक केलेल्या कामदार मंडळीसह आला होता. भोजन चाललें असतां तो मजकडे पाहून कपाळाला आंठ्या घाली. परंतु मीं तिकडे बिलकूल लक्ष न देतां व आपल्या प्रिय देशाचें नांव राखण्याकरितां आणि मंडळीस गंमत वाटावयाकरितां नेहमींपेक्षांही अधिक जेवलों. माझ्या बुद्धीस असें वाटतें कीं, बादशाहा या समयीं मला भेटावयास आला ही संधि क्लिम्नॅप् यास, त्याजकडून माझें अनिष्ट करविण्यास चांगली सांपडली. या प्रधानाचे मनांत नेहमीं मजविषयीं कुढा भाव असे. त्याचा स्वभाव मोठा द्वाष्ट असे, तरी तो माझ्याशीं वरवर मोठें प्रेम दाखवी. त्यानें बादशाहाचे कान मोठ्या शिताफीनें भरले. तो ह्मणाला, "हल्लीं तिजोरींत पैशाची फारच तूट आली आहे; व यामुळें जबर कटमितीच्या व्याजानें कर्ज काढावें लागत आहे. तसेंच

सरकारी हुंडीच्या पैशास हल्लीं शेंकडा ९ पेक्षां कमी बट्टा पडत नाहीं. सरकारास याच्या ( माझ्या ) प्रीत्यर्थ आजपर्यंत दीड लक्ष *स्प्रगज्‌पेक्षां अधिक खर्च झाला आहे. तव्हां महाराजांनीं त्वरित एकादी चांगलीशी संधि पाहून यास निरोप द्यावा हें मला बरें दिसतें."

असो; मागें [illegible]प्रमाणें नेहमीं बडेबडे लोकही माझ्या भेटीस येत असत. जो कोणी येई तो अगोदर पुढें मला चाकराच्या हातीं सांगून पाठवी. चाकरानें सूचना केल्याबरोबर मी दरवाज्यापर्यंत त्यास सामोरा जाई. मग त्याचें आगतस्वागत करून मी त्यास त्याची गाडी व दोन घोडे यांसह आणून टेबलावर ठेवीं. कदाचित् गाडीस अधिक घोडे असले तर गाडीवाला बाकीचे सोडून टाकी. गाडी खालीं पडून अपघात होईल याकरितां मीं आपल्या टेबलास सभोंवतीं पांच इंचांचा कठडा केला होता. कधीं कधीं माझ्या टेबलावर चार चार गाड्या, आंत लोक भरलेले व घोडे जुंपलेल्या अशा असत. मी आपली खुर्ची त्या टेबलाशेजारींच टाकून त्या मंडळीसमोर तोंड करून बसें. मी एका गाडींतील मंडळीशीं बोलण्यांत गुंतलों असतां बाकीच्या गाडीवाल्यांनीं आपल्या गाड्या टेबलासभोंवतीं फिरवाव्या. याप्रमाणें त्या लोकांशीं संभाषण करण्यांत माझा दोनप्रहरानंतरचा वेळ कित्येक दिवसपर्यंत मोठ्या आनंदांत गेला.

---

## प्रकरण ७.

आतां हें राष्ट्र सोडून मी कसा निघून गेलों याविषयींचा वृत्तांत सांगण्याची वेळ आली आहे. पण त्याच्या अगोदर, तेथें

---

* हें त्या देशांतील अतिशय मोठें सोन्याचें नाणें होय. हें लहानशा टिकलीयेवढें असतें.

दोन महिनेपर्यंत माझ्या विरुद्ध एक गुप्त कट चाललेला होता त्याची हकीकत सांगून, नंतर वरील वृत्तांत सांगावा हें बरें दिसतें.

मला हा काळपर्यंत राजकारस्थानें ह्मणून जीं काय ह्मणतात त्यांचा बिलकूल अनुभव नव्हता. कारण माझा जन्म हलक्या कुळांतला व माझी पदवीही कनिष्ठ, यास्तव दरबारसंबंधी कामांस मी नालायक असल्यानें त्यांत माझा शिरकाव कधींच झालेला नव्हता. मीं आजपर्यंत मोठमोठे राजे व राजकार्यधुरंधर पुरुष यांच्या स्वभावाविषयीं पुष्कळ गोष्टी वाचिल्या व ऐकिल्या होत्या. पण ह्या इतक्या दूरच्या देशांतही त्यांचे येवढे भयंकर परिणाम होत असतील हें माझ्या ध्यानींमनीं देखील नव्हतें. कारण येथील राज्यकारभाराची रीत युरोपांतील रीतीहून फार भिन्न असा माझा समज होता.

मी ब्लेफुस्कू येथील बादशाहाची भेट घेण्यास जाण्याचे तयारींत असतां, कोणी एक बराच वजनदार सरदार एके दिवशीं रात्रीं गुप्त रीतीनें मजकडे आला. त्याजवर पूर्वीं एकदां बादशाहाची अतिशय गैरमर्जी झाली होती त्या वेळीं मी त्याच्या फार उपयोगीं पडलों होतो. त्यानें आपलें नांवगांव पाहिल्यानें कांहींएक सांगून न पाठवितां नुसतीच दरवाज्याबाहेरून वर्दी दिली कीं, कोणी गृहस्थ तुमच्या भेटीची इच्छा करीत आहे. यावरून माझ्या टेबलावर कांहीं गृहस्थ खुर्च्यांवर गप्पा मारण्याकरितां बसले होते त्यांस मी निरोप देऊन दरवाज्यापाशीं आलों, आणि त्या सरदारास त्याच्या खुर्चीसकट आपल्या आंगरख्याच्या खिशांत घातलें. मग दरवाजा घट्ट बंद करून घेऊन एका विश्वासू नोकरास तेथें असण्यास सांगितलें, व बाहेरून कोणी आल्यास मी निजलों आहें असें सांग ह्मणून त्यास ताकीद दिली. नंतर ती खिशांतली खुर्ची टेबलावर ठेवून त्या सरदाराच्या शेजारीं मी नित्याप्रमाणें आपल्या खुर्ची-

वर बसलों. चालीप्रमाणें आगतस्वागत व कुशलप्रश्न झाल्या-
वर, त्या सरदाराची मुद्रा चिंतातुर पाहून मी त्यास त्यावि-
षयींचें कारण विचारलें. त्यानें सांगितलें कीं, ज्या " प्रक-
रणाविषयीं आतां मी तुमच्याशीं बोलणार आहें, त्या प्रकरणांत
तुमच्या अब्रूचा व जिवाचा विशेष संबंध आहे; यास्तव त्या-
विषयींची हकीकत तुम्ही शांतपणें व लक्षपूर्वक ऐकून घ्या. "
असें बोलून त्यानें ती हकीकत सांगण्यास आरंभ केलाः—

तो म्हणाला, " अलीकडे कित्येक वेळां तुमचे संबंधानें
विचार करण्याकरितां फार गुप्त रीतीनें दरबार भरून त्या
प्रकरणीं शेवटचा ठराव बादशाहानें नुकताच दोन दिवसां-
पूर्वीं केला.

" तुह्मांस माहीतच आहे कीं, बहुतकरून तुम्ही येथें
आल्या दिवसापासूनच स्कायरेश बोल्गोलम् ह्यानें तुमच्याशीं
हाडवैर धरिलें आहे. या गोष्टीस मूळ कारण काय झालें तें
मला ठाऊक नाहीं; परंतु त्याचा द्वेष तुमच्याशीं वृद्धिंगत
होण्याचें कारण ब्लेफुस्कूचे आरमारावर तुम्हांस जय मि-
ळाला हें होय. कां तर तेणेंकरून, समुद्रावरील अद्वितीय
वीर अशी जी त्याची आजपर्यंत ख्याति होती तिला पुष्कळच
कमीपणा आला. हा सरदार, व फ्लिम्नॅप् ह्मणजे मुख्य ख-
जानजी, ( याचें शत्रुत्व तर तुमच्याशीं सर्वप्रसिद्धच आहे, )
तसेंच लाल्कन् ह्मणजे मंत्री, व बाल्मफ् ह्मणजे न्यायाधीश,
इतक्यांनीं मिळून तुमच्यावर राजद्रोहाचें व दुसऱ्या कित्येक
मरणदंडक अपराधांचें कड्याळ रचिलें आहे. "

इतका त्यानें त्या एकंदर गोष्टीचा प्रस्ताव केला. आतां
वास्तविक पाहतां आपल्याकडून तर तिळप्रायही अपराध
घडला नसून आपण उलटे बादशाहाच्या उपयोगींच पडलों,
अशी माझें अंतःकरण तर मला पूर्ण साक्ष देत होतें. तेव्हां

या लुच्चांनीं हें विनाकारण थोतांड आपणावर रचलें हें ऐकून माझ्या तळव्याची आग मस्तकास गेली; व मी त्या रागाच्या आवेशांत मध्येंच त्या गृहस्थास थांबवून कांहीं बोलणार, तों त्यानें विनंति केली कीं, तुह्मी अंमळ शांत व्हा, व माझें बोलणें पूर्णपणें ऐकून घेऊन मग काय करावयाचें तें करा. असें म्हणून त्यानें खालीं लिहिल्याप्रमाणें बोलण्यास पुनः सुरुवात केली.

तो म्हणाला, " तुमचे मजवर महदुपकार झाले आहेत, ते मी कधींही विसरणार नाहीं; व या समयीं कृतज्ञपणाचा जो माझा धर्म त्यास स्मरून जिवाची देखील पर्वा न करितां मीं मोठ्या प्रयासानें त्या सर्व प्रकरणाची खडानखडा माहिती मिळवून कोणकोणत्या गोष्टींबद्दल त्यांनीं तुमचेवर दोषारोप ठेविला आहे, त्या सर्व कलमांची एक नक्कल आणिली आहे; ती ही:—

## ' पर्वतेश्वर ह्याजवरील दोषारोपांचीं कलमें.

### ' कलम १ लें.

' पर्वतेश्वर यानें ब्लेफुस्कूचे बादशाहाचें आरमार ह्या राज्याचे हद्दींतील बंदरांत आणिल्यानंतर त्यास, म्हणजे सदर्हू पर्वतेश्वर ह्यास, सदरील ब्लेफुस्कूचे राज्यांतील बाकीचीं सर्व जहाजें धरण्याविषयीं व तें राज्य खालसा करण्याविषयीं सरकारचा हुकूम झाला असतां मशारनिल्हे पर्वतेश्वर यानें ' त्या निरपराधी लोकांचे जिव घेण्यास किंवा त्यांची स्वतंत्रता नाहींशी करण्यास आपण खुषी नाहीं ' असा बहाणा करून ' ही चाकरी न करण्याबद्दल माफी असावी, ' असा सरकारास अर्ज केला. ही त्यानें लबाडीची व राजद्रोहाची कृति केली.

### ' कलम २ रें.

' ब्लेफुस्कू येथील बादशाहाकडून सरकारचे दरबारीं जे

कित्येक वकील तहाच्या बाबदींत बोलणें करण्याकरितां आले होते, ते, जो बादशाह नुकताच धडधडीत सरकारचा शत्रु असून सरकाराशीं लढाई करीत होता, त्याचे नोकर असें त्यास माहीत असून त्यानें त्यांस अनेक प्रकारें साह्य केलें, त्यांची बरदास्त ठेविली, व त्यांचें आगतस्वागत केलें; तेव्हां हें कृत्य सरकारचा अधिकार, दर्जा व मर्तबा यांचे विरुद्ध त्यानें केलें.

'कलम ३ रें.

'हल्लीं सदहू पर्वतेश्वर हा ब्लेफुस्कू येथें बादशाह व त्याचे दरबारी लोक ह्यांची भेट घेण्याकरितां जाण्याची तयारी करीत आहे. ह्याबद्दल त्यास सरकारची तोंडी परवानगी मिळाली आहे, तरी असें करणें हें बेइमानीपणाचें काम असून सदहू परवानगी मिळाल्याची संधि साधून, तो ह्मणजे पर्वतेश्वर, जो बादशाह थोड्याच दिवसांपूर्वीं सरकारचा उघड शत्रु असून सरकाराशीं लढाई करीत होता, त्याची भेट घेण्याचा बेत करून, त्या योगें त्यास ह्मणजे सदहू बादशाहास मदत वगैरे देण्याचा विचार करीत आहे; यास्तव हें त्याचें करणें विश्वासघाताचें व राजद्रोहीपणाचें आहे.'

"ह्याखेरीज आणखी कित्येक कलमें आहेत, पण हीं वर सांगितलेलीं सर्वांत महत्वाचीं आहेत.

"ह्या दोषारोपांबद्दल दरबारांत अनेक वेळां वादविवाद झाले. त्या प्रत्येक वेळीं सरकारचें बोलणें तुमचेवर दया करावी असें फार असे. तुह्मीं त्यांची जी मोठी कामगिरी बजाविली त्याविषयीं ते वारंवार बोलून दाखवीत, व त्या मानानें तुमचे गुन्हे फारच हलके आहेत असें ह्मणत. खजानजी व अमीर उल्बहार ( आरमारावरील मुख्य अधिकारी ) यांनीं असा आग्रह धरिला कीं, तुमचे घरास रात्रीं आग लावून देऊन तुह्मांस जिवंत जाळून टाकावें. कदाचित् आगींतून तुह्मी बाहेर

पडून पळावयास लागला तर त्या ठिकाणीं सेनापतीनें वीस हजार लोक विषयुक्त बाण तुमचे हातांवर व तोंडावर तत्काळ सोडण्यास तयार ठेवून हजर रहावें. तसेंच तुमच्या निजण्याच्या व अंगांत घालण्याच्या कपड्यांवर कांहीं विषारी पाणी शिंपडण्याविषयीं तुमचे घरांतील चाकरमाणसांस पूर्वी गुप्त हुकूम देऊन ठेवावे—जेणेंकरून ताबडतोब तुमचे अंगास पराकाष्ठेची कंडू सुटून तुम्ही आपले हातांनींच आपलें अंग ओरबाडून रक्तबंबाळ करावें—सारांश, अशा रीतीनें हालअपेष्टा करून तुह्मांस मारावें. या गोष्टीस सेनापतींनेंही आपलें अनुमत दिलें. याप्रमाणें पुष्कळ वेळपावेतों बहुतेकांचीं मतें तुमच्या विरुद्ध होतीं; परंतु सरकारचे मनांत होईल तेथपावेतों तुमचा जीव वांचवावा असे फार होतें, सबब त्यांनीं शेवटीं मंत्री यास त्या कटांतून फोडलें.

" यानंतर रेल्ड्रेसल् ( खाजगीकडील मुख्य कारभारी ) यास या प्रकरणीं आपला अभिप्राय देण्याविषयीं बादशाहाचा हुकूम झाला. हा तुमचा खरा मित्र ह्मणवितो हें तर सर्वप्रसिद्धच आहे, व तुमचे मनांत त्याजविषयीं जो चांगला ग्रह आहे तो त्यान हल्लींच्या आपल्या बोलण्यावरून खरा करून दाखविला. तो म्हणाला, ' पर्वतेश्वर याचे अपराध मोठे आहेत हें मी कबूल करतों; तथापि ते क्षमेस पात्र आहेत; व क्षमाशीलता हा गुण राजाचे अंगीं असणें हें मोठें भूषण असून त्याविषयीं महाराजांची जी एवढी कीर्ति आहे ती यथार्थच आहे. आतां त्याची माझी मैत्री आहे, हें जगद्विश्रुत आहे; व यास्तव माझें बोलणें पक्षपाताचें आहे असें मोठ्या थोर मनाच्या पुरुषांच्या देखील मनांत येईल; तथापि सरकारचे आज्ञेबरहुकूम मी आपला अभिप्राय स्पष्टपणें कळवितों. माझ्या अल्प बुद्धीस असें वाटतें कीं, पर्वतेश्वर यानें सरकारचीं जीं कामें केलीं आहेत, तीं मनांत आणून व सरकारांनीं आपल्या नेहमींच्या दयाळू स्वभा-

यास अनुसरून त्यास जीवदान द्यावें, आणि फक्त त्याचे डोळे [illegible] हुकूम द्यावा. येणेंकरून सर्व जगभर सरकारचे दयाळूपणाची वहावा होऊन न्यायही केलासा होईल, व ज्यांस सरकारच्या प्रधानकीचा अधिकार प्राप्त झाला आहे त्यांच्याही औदार्याची व चांगुलपणाची जगांत कीर्ति होईल. त्यांतून डोळे काढिल्यानें त्याच्या शरीरशक्तीस कोणत्याही प्रकारें क्षीणत्व न यतां तो पूर्ववत् सरकारच्या उपयोगींही पडण्यास हरकत नाहीं. तसेंच अंधळेपणापासून मनुष्याच्या धैर्यास एका प्रकारें अधिकच जोर येतो; कारण तेणेंकरून त्यास डोळ्यांसमोर म्हटली म्हणजे कसलीच भीति नसते. आणि शत्रूचें आरमार आणितेवेळीं तरी पर्वतेश्वर यास मोठी धास्ती काय ती डोळ्यांनीच येऊन पडली होती. तेव्हां आतां तेवढे नाहींसे झाले म्हणजे अर्थात् तो प्रधानमंडळाच्या ह्मणण्याप्रमाणेंच चालेल; व तेवढें आपणांस पुरे आहे. आणि मोठमोठे राजे झाले तरी काय, प्रधान हेच त्यांच डाळ; ते सांगतील त्याप्रमाणेच त्यांस चालावयाचें असतें.' ही गोष्ट त्या मंडळीपैकीं कोणासही तिळभर देखील रुचली नाहीं. अमीर उल्बहार याचें तर इतकें पित्त खवळून गेलें कीं, तो संतापानें अगदीं लाल होऊन गेला. तो मोठ्या त्वेषानें म्हणाला, 'राजद्रोही मनुष्याचा [illegible] हे गृहस्थ ( खाजगीकडील कारभारी ) आपला अभिप्राय देण्यास कसे धजावतात याचा मला मोठा विस्मय वाटतो. गजकारणाच्या संबंधानें विचार केला तर, वास्तविक पाहतां त्यानें जीं सरकारचीं मोठमोठीं कामें केलीं तींच त्याच्या अपराधाचें स्वरूप दसपट ज्यास्त भयंकर करण्यास कारण झालीं आहेत. असें पहा कीं, त्यानं शत्रूचें आरमार इकडे धरून आणिलें खरें, पण अर्थात् त्याची मर्जी फिरतांच तें त्यास परतही नेण्यास कांहीं विलंब लागणार नाहीं ! [illegible] द्रोहाचें कृत्य मनुष्य

आपल्या हातांनीं करण्यापूर्वी त्याच्या अंतःकरणांत तो प्रथम उत्पन्न होतो; तेव्हां हीं सर्व कारणें मनांत आणून मी त्याजवर राजद्रोहाचा आरोप ठेवून त्याचा शिरच्छेद करण्याविषयीं आग्रहपूर्वक शिफारस करितों.'

"खजानजीचेंही मत असेंच पडलें. तो म्हणाला, 'पर्वतेश्वर याच्या पोटानिमित्त जो जबर खर्च चालला आहे, त्यामुळें खजिन्यांतील शिलकेस केवढी मोठी तूट आली आहे हें पूर्वी मीं सरकारांस विदित केलेच आहे; व हा खर्च असाच चालू ठेवल्यास पुढील चिन्ह ठीक दिसत नाहीं. आता खाजगीकडील कारभारी यांणीं त्याचे डोळे काढण्याविषयीं जी तोड सुचविली, तिजपासून हित तर कांहीं होईलसें दिसत नाहीं, पण उलटें अनहित मात्र होण्याचा संभव आहे. याचा दाखला पाहण्यास दूर जाणें नको. कांहीं जातींचे पक्ष्यांस अंधळे करतात, ते तसे केल्यावर अधिक खादाड आणि लठ्ठ होत असतात. तेव्हां एकंदरीनें, महाराज व प्रधानमंडळ यांची जी त्याचे अपराधांविषयीं पूर्ण खातरी झाली आहे, तीच त्यास देहान्तशिक्षा देण्यास सबळ कारण आहे; व आतां आणखी कायद्याच्या रीतीनें दुसरा योग्य पुरावा करण्याची देखील जरूरी आहे असें नाहीं.'

"परंतु [illegible] न देण्याविषयीं महाराजांच्या मनाचा पक्का निश्चय होऊन ते मेहेरनजर करून म्हणाले कीं, 'जर डोळे काढणें ही शिक्षा फारच हलकी असें सभेस वाटत असेल, तर दुसरी आणखी कांहीं शिक्षा ठरवितां येईल.' आणि तुमच्या खाण्यापिण्याच्या जबर खर्चाच्या संबंधानें खाजगीकडील कारभारी यांच्या बोलण्यावर खजानजी यांनीं जी तक्रार केली, तिचें खंडन करण्याकरितां आपणास बोलावयाचें आहे, अशाविषयीं त्यांनीं म्हणजे खाजगीकडील कारभारी यांनीं विनय-

पूर्वक सभेस आपली इच्छा दर्शवून भाषण केलें, तें असें:—
ते बोलले, 'खजानजी यास राज्याच्या सर्व वसुलाची व्यवस्था करण्याचा अधिकार आहेच; तेव्हां त्यांनीं त्याच्या पोटापाण्याच्या खर्चाची नेमणूक थोडथोडी कमी करून टाकावी म्हणजे झालें. मग अर्थात् पोटाला चिमटा बसला म्हणजे त्याचें शरीर निःशक्त होऊन तो फिक्का पडून जाईल, व त्याच्या भुका मरून थोड्याच दिवसांत झिजून झिजून तो मरेल. अशा रीतीनें मेला म्हणजे त्याच्या प्रेताच्या दुर्गंधीचेंही येवढें मोठें भय बाळगण्याचें कारण उरणार नाहीं. कारण तोंपर्यंत त्याचें शरीर अर्धें देखील राहणार नाहीं; व तो मेला कीं, लागलीच दोन तीन दिवसांत पांच सहा हजार लोक लागले म्हणजे त्याच्या अंगाचें मांस हाडांपासून कापून काढून गाड्यांमध्यें भरून दूर चोहोंकडे पुरून टाकतील. तेणेंकरून रोग होण्याचीही भीति राहणार नाहीं; आणि पूर्वी असला एक प्रचंड मनुष्य या देशांत आला होता ही पुढील लोकास आठवण राहण्याकरितां त्याच्या हाडांचा सांपळा हें एक आश्चर्यचिन्हच होऊन राहील.'

"याप्रमाणें खाजगीकडील कारभारी यांशीं तुमचें सख्य असल्याकारणानें या प्रकरणाची अशा रीतीनें तोड पडली. तुह्मांस उपाशीं मारण्याचा जो ठराव तो गुप्त ठेवण्याविषयीं सक्त हुकूम झाला आहे. परंतु तुमचे डोळे काढण्याविषयींचा ठराव शिक्षेच्या बुकांत नोंदण्यांत आला आहे. या गोष्टीस फक्त अमीर उल्बहार खेरीज करून बाकीच्या सर्व सभासदांनीं आपली संमति दिली. त्याचें एकट्याचें मात्र शेवटपर्यंत असें म्हणणें होतें कीं, त्यानें (म्हणजे तुम्हीं) शत्रूचें आरमार धरून आणिलें नाहीं, हा त्याचा महान् अपराध होय, व त्याबद्दल त्यास देहदंडाखेरीज दुसरें कोणतेंही शासन बिलकूल योग्य नाहीं.

"आतां तीन दिवसांचे आंत तुमचे मित्र खाजगीकडील कारभारी यांस तुमचेकडे येऊन तुमचे समोर पूर्वी सांगितलेली दोषारोपांचीं कलमें वाचून दाखविण्याचा हुकूम होईल. त्याचप्रमाणें, महाराज व प्रधानमंडळ यांचा तुमचेवर मोठा लोभ असल्यामुळें तुमचे अपराधानुरूप तुम्हांस भयंकर व क्रूर शिक्षा न ठरवितां मोठी मेहेरनजर करून फक्त तुम्हांस डोळे काढण्याची, म्हणजे फारच हलकी शिक्षा देण्याचा ठराव करण्यांत आला आहे, यास्तव या ठरावास तुम्ही कृतज्ञतापूर्वक गुण्यागोविंदानें मान्य व्हाल अशी सरकारास फार उमेद आहे, असेंही तुम्हांस सांगण्याविषयीं त्यांजला हुकूम होईल. मग तुम्ही आडवे पडला असतां तुमचे डोळ्यांत तीक्ष्ण अग्रांचे बाण सोडून सदरहू शिक्षा अमलांत आणली जाईल; व ती पूर्णपणें अमलांत आली किंवा नाहीं हें पहाण्याकरितां त्या ठिकाणीं वीस शस्त्रवैद्य हजर असतील.

"हा एकंदर झालेला प्रकार तुम्हांस सांगितला आहे; तर याबद्दल तुम्हांस योग्य दिसेल ती तजवीज तुम्ही करालच. आतां मी आलों त्याच रीतीनें मला ताबडतोब गुप्तपणें परत गेलें पाहिजे. कारण कदाचित् कोणाच्या दृष्टीस पडलों तर रिकामी संशयास जागा." असें म्हणून तो गृहस्थ चालता झाला, व मी तेथें एकटाच आपल्या मनाशीं विचार करीत बसलों; परंतु मला काय करावें हें सुचेना. माझ्या मनांत हजारों प्रकारच्या शंका आणि हजारों प्रकारचे तरंग येऊं लागले.

त्या देशांत असा एक प्रघात आहे—तो जुना नसून हल्लींचा बादशाह व त्याचें प्रधानमंडळ यांनीं नवीनच सुरू केलेला आहे—कीं, बादशाहाच्या क्रोधास्तव किंवा त्याच्या कृपेंतील एकाद्या मनुष्याच्या द्वेषास्तव जेव्हां कोणास एकादी क्रूर शिक्षा देण्याचा ठराव होतो, तेव्हां बादशाह दरबारांत त्या शिक्षेच्या

संबंधानें एक भाषण करीत असतो. या भाषणांत दयाळूपणा व सौम्यता या सद्गुणांविषयीं जी त्याची सर्व जगभर ख्याति आहे ती पूर्णपणें तो व्यक्त करून दाखवितो. मग लागलेंच हें भाषण राज्यांत चोहोंकडे प्रसिद्ध होतें. त्यांत त्याच्या दयालुत्वाविषयीं जितका जितका म्हणून प्रशंसेच्या गोष्टींविषयीं उल्लेख असतो, तितके तितके लोकांच्या अंगावर भीतीमुळें रोमांच उभे राहतात; कारण हे उल्लेख जितके जितके ज्यास्त असतील तितका तितका शिक्षा भोगणाराचा अपराध कमी व त्यास भोगावयाची शिक्षा अधिक क्रूरपणाची असें समजावयाचें. पण मला जी ही शिक्षा ठरविण्यांत आली होती, ती मेहेरनजरेनें फारच थोडी ठरविली होती; असें असतां ती मला तर हलकी न वाटतां उलटी कडकच आहे असें वाटलें. हा माझा समज कदाचित् चुकीचाही असेल; कारण माझा जन्म हलक्या कुळांतला व शिक्षणही त्याच प्रतीचें, यामुळें दरबारी लोकांच्या मख्या मला कोठून कळणार? केव्हां केव्हां माझ्या मनांत येई कीं, आपल्या अपराधांची पुनः नीट चौकशी होण्याविषयीं कांहीं इलाज करावा. कारण जरी मजवरील दोषारोप मला अगदीं उडवितां येतील असे नव्हते, तरी माझी शिक्षा थोडीबहुत हलकी होईल अशी मला उमेद होती. तथापि आजपर्यंत पुष्कळ दरबारी इनसाफ माझे पाहण्यांत आले होते; व त्यांत न्यायाधिशाची मर्जी हाच न्याय असें नेहमीं दृष्टीस पडे. यास्तव असल्या आणीबाणीच्या प्रसंगीं व अशा बलाढ्य शत्रूंच्या विरुद्ध भांडून आपणास यश येईल असा मला भरंवसा येईना. एकदां तर दंडेलपणा करावा असेंही माझ्या मनांत आलें. कारण राज्यांतील सर्व लोक जरी एकदम माझ्यावर आले असते, तरी मला जोंपर्यंत मोकळीक होती तोंपर्यंत त्यांच्यानें माझें कांहींएक झालें नसतें; व नुसते

दगड मारून मीं राजधानीचा सहज चुराडा करून टाकला असता. परंतु मीं पूर्वीं बादशाहापाशीं शपथ वाहिली होती, व त्याचे मजवर पुष्कळ उपकार झाले होते; तसेंच त्यानें मला 'नाडाक' ही मोठी सन्मानाची पदवी दिली होती, या सर्व गोष्टी मनांत आणून मीं तें घोर कृत्य करण्याचा उद्देश तत्काळ रहित केला. खेरीज बादशाहाची आपणावर हल्लीं करडी नजर झाली आहे, त्या अर्थीं पूर्वीं त्यानें जे आपणावर उपकार केले त्यांबद्दल आपण त्याचें आतां कांहीं लागत नसून त्याच्या बोकांडीस बसण्यास कांहीं हरकत नाहीं, हा राजकारस्थानी कावाही अजून मी शिकलों नव्हतों !

असो; शेवटीं मीं एक तिसऱ्याच प्रकारचा निश्चय केला. आतां ह्याबद्दल कित्येक लोक मला वेडा ह्मणतील तर ह्मणोत, व त्यांचें तें ह्मणणें केवळ असमंजसपणाचें होय असेंही मी ह्मणत नाहीं; पण खरोखर ह्मटलें तर माझा अविचारीपणा आणि अभिमानशून्यता हींच माझे डोळे बचावण्यास व मला स्वतंत्रता मिळण्यास कारण झालीं हे मला कबूल केलें पाहिजे. कारण, त्या वेळीं जर मला राजदरबारी रिवाजांची माहिती असती, व मजपेक्षांही कमी अपराधी लोकांस कसल्या प्रकारच्या शिक्षा मिळतात हें मला ठाऊक असतें, तर मला जी ही येवढी हलकी शिक्षा ठरविली होती, तीस मी मोठ्या आनंदानें व तत्परतेनें मान्य झालों असतों. परंतु तारुण्यांतील दू[illegible]पणामुळें, व ब्लेफुस्कू येथील बादशाहाचे भेटीस जाण्याविषयीं आमच्या बादशाहाचा पूर्वीं हुकूम मिळाला असल्यामुळें, येथून तूर्त निसटून जाण्यास ही संधी बरी आहे असें वाटून मीं ताबडतोब त्या तीन दिवसांचे आंत ब्लेफुस्कूस जाण्याचा निश्चय केला; आणि माझे स्नेही खाजगीकडील कारभारी यांस पत्रद्वारें कळविलें कीं, मला परवानगी

मिळाल्याअन्वयें उदईक प्रातःकाळीं मी ब्लेफुस्क येथें चालता होणार; व पत्रोत्तराची वाट न पाहतां, जिकडे आमचे बादशाहाचें आरमार होतें त्या किनाऱ्याकडे निघून गेलों, व एका लढाऊ जहाजाच्या नाळीस दोर बांधून त्याचा नांगर उखळला, आणि पलंगपोस मात्र कांखोटीस मारून अंगावरील सर्व कपडे त्या जहाजांत घातले, व त्याची दारी हातांत धरून ते ओढीत ओढीत, कांहीं चालत व कांहीं पोहत असा ब्लेफुस्कूच्या राज्याच्या हद्दींतील बंदरांत जाऊन दाखल झालों. तेथें लोक माझी मार्गप्रतीक्षा करूनच राहिल होते. त्यांनीं मला राजधानीचा मार्ग दाखविण्यास दोन इसम दिले. • •ा•ा•ु तेच ह्मणजे ब्लेफुस्कू हेंच नांव आहे. मी त्या दोघांस आपल्या हातांत घेऊन चाललों व शहरापासून १०० यार्डांच्या अंतरावर आल्यावर त्यांस सांगितलें कीं, ' राजदरबारांतील चिटणिसास मी आल्याची वर्दी द्यावी, व त्या ठिकाणीं मी सरकारच्या हुकमाची वाट पाहून राहिलों आहें म्हणून सांगावें.' सुमारें एका तासानंतर मला जबाब आला कीं, ' बादशाहाची स्वारी, राजघराण्यांतील इतर माणसें व अमीरउमराव यांसह तुम्हांस सामोरी यावयास निघाली आहे. ' मग मी सुमारें १०० यार्ड आणखी पुढें गेलों, तों त्या मंडळींची व माझी गांठ पडली. तेव्हां बादशाहासुद्धां सर्व लोक आपल्या घोड्यावरून खालीं उतरले. तसेंच राणीसाहेब व इतर स्त्रियाही रथांतून खालीं उतरल्या. मी जमिनीवर आडवा पडलों व बादशाह व राणीसाहेब यांच्या हाताचें चुंबन घेतलें. मीं बादशाहास सांगितलें कीं, ' मी आपल्या धन्याची परवानगी घेऊन पूर्वीं वचन दिल्याप्रमाणें महाराजांच्या चरणदर्शनास आला आहें, व माझ्या धन्याविषयीं जें माझें कर्तव्यकर्म तें संभाळून, आज्ञा झाल्यास शक्त्यनुसार मी महाराजांची सेवा करण्यास तयार आहें.'

मजवर हल्लीं आमच्या सरकारची गैरमर्जी झाली आहे अशा-बद्दल कांहींएक चकारशब्द देखील काढिला नाहीं. कारण त्या-बद्दल मला उघड रीतीनें कांहीं बातमी कळली नसून, मी लि-लिपटच्या [illegible] अमलाबाहेर असतांना तो तरी ती गुप्त गोष्ट फोडील असाही संभव नाहीं असें मला वाटलें. पण हा माझा समज चुकीचा होता हें मला लवकरच कळून आलें.

ब्लेफुस्कूचे दरबारीं माझा आदरसत्कार वगैरे कसा काय झाला याविषयींची कच्ची हकीकत मी सांगत नाहीं; कारण वाचकांस कदाचित् कंटाळा येईल. तथापि इतकें सांगणें जरूर आहे कीं, त्या थोर व पराक्रमी बादशाहाच्या औदार्यास व मोठेपणास योग्य अशी त्यानें माझी बरदास्त ठेविली. आतां तेथें मला राहण्यास घर व बिछाना वगैरे नसल्यामुळें माझी अडचण फार झाली, व मला नुसत्या जमिनीवरच आपला पलं-गपोस खालीं वर करून पडावें लागत असे हें खरें; पण ह्या गोष्टी अपरिहार्य होत्या.

---

## प्रकरण ८.

ब्लेफुस्कू येथें येऊन दोनतीन दिवस झाल्यावर एके दि-वशीं मी त्या बेटाच्या ईशान्य दिशेकडे, सहज तो प्रदेश अवलोकन करावा ह्मणून फिरत फिरत गेलों. तों किनाऱ्यापा-सून सुमारें एका कोसाचे अंतरावर समुद्रांत होडीसारखें कांहीं उपडें पडलेलें माझ्या दृष्टीस पडलें. मीं पायांतील जोडा व पायमोजे काढून घेतले, व पाण्यांतून चालत चालत दोनतीनशें यार्ड गेलों, तों तो पदार्थ लाटांच्या जोरानें माझ्या अधिक ज-वळ जवळ येत आहेसे दिसलें; आणि लवकरच ती खरोखरच होडी आहे असें दिसून आलें. ही होडी वादळामुळें एकाद्या जहाजापासून वहावत आली असावी अशी माझ्या मनांत क-ल्पना आली. मग मी लागलाच राजधानीस परत गेलों, आणि

बादशाहास विनंति केली कीं, सरकारचें आरमार तिकडे (लिलिप-टकडे ) नेल्यावर बाकीचीं जीं तारवें राहिलीं असतील त्यांपैकीं अतिशय उंच अशीं वीस तारवें, व दुय्यम अमीर उल्बहार याचे हाताखालीं तीस हजार खलाशी इतक्यांची तूर्त मला फार जरूरी आहे, तरी तेवढें मिळण्याबद्दल मेहेरबानीनें हुकूम मिळावा. बादशाहाचा हुकूम होतांच, ज्या ठिकाणीं प्रथम होडी माझ्या दृष्टीस पडली होती, त्या बाजूचे किनाऱ्याकडे जो अतिशय जवळचा रस्ता होता त्या रस्त्यानें मी गेलों, व बाकीचे जहाजांसुद्धां सर्व लटांबरही येण्यास निघालें. इकडे होडी लाटांच्या जोरानें पूर्वीपेक्षाही अधिक जवळ आली होती. खलाशांपाशीं दोरखंडें होतीं त्यांपैकीं मीं कित्येक एकत्र करून कामापुरता बळकट असा त्यांचा एक दोर तयार करून ठेविला होता. वर सांगितलेलें लहानसें आरमार मजपाशीं येऊन दाखल झाल्यावर मी अंगावरील कपडे काढून घेऊन पाण्यांतून चालत चालत होडीपासून सुमारें १०० यार्डांच्या अंतरावर आलों, परंतु पुढें पाण्याची खोली अधिक झाल्यानें होडीपर्यंत मला पोहत जावें लागलें. खलाशांनीं त्या दोराचें एक टोंक मजकडे फेंकलें, तें मी घेऊन होडीच्या नाळीच्या एका भोंकास बांधून दुसरें त्या आरमारांपैकीं एका जहाजास बांधून टाकिलें, परंतु माझा येवढा खटाटोप व्यर्थ झाल्यासारखा झाला. कारण जमिनीस माझे पाय पोहोंचत नसल्यानें, पोहण्याकडे माझे हात गुंतले. तेव्हां दुसरें कांहीं काम करण्याची चांगलीशी सवड मला सांपडेना. अशी माझी तारंबळ उडून गेली. तेव्हां मी पोहत पोहत जहाजाच्या पाठीमागे गेलों, आणि एका हातानें थोडीबहुत जी काय होडी ढकलवली तेवढी ढकलीत ढकलीत चाललों. तशांत पाण्यासही हल्लीं ओहटी पडत चालली होती, यामुळें माझ्या पायांस जमीन लागून तोंडही लवकरच वर झालें. मग दोनतीन मिनिटें

विश्रांति घेऊन मी पुनः होडी ढकलीत ढकलीत चाललों, तों थोड्या वेळानें पाणी पुष्कळ कमी म्हणजे माझ्या छातीइतकें झालें. तेव्हां अर्थात अतिशय श्रमाचे काम तर उरकलेंच. मग मी त्या जहाजांपैकी एकांत जीं आणखी कित्येक दोरखंडें भरून आ-



“ खलाशी दोऱ्या ओढूं लागले, व मी होडी ढकलूं लागलों. ” ( पृष्ठ ८६. )

णविलीं होतीं, तीं प्रथमतः होडीस व नंतर त्या आलेल्या जहाजां-पैकीं नऊ जहाजांस बांधून टाकिलीं. मग खलाशी दोऱ्या ओढूं लागले व मी होडी ढकलूं लागलों. आणि वाराही त्या संधीस अनुकूळ असा लागला, तेव्हां ती होडी भरादिशीं किनाऱ्या-

पासून ४० यार्डांच्या अंतरावर येऊन थडकली. मग पाण्यास अगदीं ओहटी पडे तोंपर्यंत मी थांबलों. तेव्हां होडीची जागा कोरडी ठणठणीत होऊन गेली. मग दोन हजार खलाशांस कांहीं दोरखंडें व कांहीं यंत्रें यांसह मदतीस घेऊन मीं ती होडी उताणी करून पाहिली. तिची कांहींएक खराबी न होतां जशींची तशीच ती सायसंगीत होती.

ही होडी ब्लेफुस्कू बंदरांत नेण्यास मला दहाबारा दिवस लागले; व त्यासाठीं हातवल्हीं वगैरे करण्याकरितां मला पुष्कळच त्रास पडला. असो; बंदरांत होडी येतांच ती पाहण्याकरितां लोकांची तेथें पराकाष्ठेची गर्दी जमली. त्यांस येवढें थोरलें तें अजस्र तारूं पाहून महदाश्चर्य वाटलें. मीं बादशाहास सांगितलें कीं, माझ्या सुदैवानें ही होडी मला आढळली आहे, व हिजमध्यें बसून मी कोणत्या तरी एकाद्या स्थळास पोंचून तेथून स्वदेशास जाईन अशी माझी मनदेवता मला सांगते. यास्तव मला येथून जाण्यास व होडींत भरण्याकरितां सामानसुमान पाहिजे तें देण्यास महाराजांनीं कृपावंत होऊन हुकूम द्यावा. त्यानें मला कित्येक हिताच्या गोष्टी सांगून शेवटीं माझें म्हणणें मान्य केलें.

आतां माझ्या संबंधानें लिलिपटचे बादशाहाकडून अद्यापपावेतों ह्या दरबारीं कोणी वकील वगैरे आल्याचें माझे ऐकिवांत आलें नाहीं, म्हणून मी इतका वेळ आश्चर्यच करीत होतों. इतक्यांत खाजगी रीतीनें मला अशी बातमी लागली कीं, त्या बादशाहाचे मनांत मला त्याचे गुप्त बेत बिलकुल कळले नसून त्याची अशी समजूत होती कीं, आपण यास ( मला ) पूर्वीं हुकूम दिल्याअन्वयें हा ब्लेफुस्कू येथें गेला आहे, व तेथें जे काय शिष्टाचार व्हावयाचे ते झाले म्हणजे आपल्या वचनाप्रमाणें थोड्याच दिवसांत तो परत येइल. परंतु मला पुष्कळ

दिवस लागले यामुळें तो फार चिंतेंत पडला; आणि खजानजी व दुसरी त्या कटांतील मंडळी यांचा सल्ला घेऊन त्यानें मजवरील दोषारोपाच्या कलमांच्या यादीची एक नक्कल एका हुशार वकिलापाशीं देऊन त्यास येथील बादशाहाकडे पाठविलें. बादशाहास असें सांगण्याविषयीं त्यास हुकूम झाला होता कीं, आमचे महाराजांनीं मोठी मेहेरनजर करून फक्त त्याचे (माझे) डोळे काढण्याविषयीं ठराव केला आहे, दुसरें कांहीं नाहीं; व त्यास न्यायाच्या रीतीनें जें शासन मिळावयाचें तें न मिळतां तो पळून गेला आहे, यास्तव जर तो दोन तासांचे आंत परत येणार नाहीं, तर त्याची 'नार्डाक' ही पदवी रद्द करून हा राजद्रोही मनुष्य आहे असें प्रसिद्ध करण्यात येईल. तसेंच उभय राष्ट्रांतील सल्ला आणि स्नेह कायम राहण्याकरितां त्याचे हातांत व पायांत बिड्या घालून त्यास फितुराबद्दल शिक्षा भोगण्याकरितां लिलिपट येथे परत पाठविण्याचा हुकूम होईल अशी आमचे महाराजांस फार उमेद आहे.

बादशाहानें या गोष्टीचा तीन दिवसपर्यंत विचार करून पुढें लिहिल्याप्रमाणें सामोपचाराचें उत्तर दिलें:—तो त्या वकिलास म्हणाला, 'त्यास बांधून पाठवून देणें म्हणजे केवळ अशक्य होय. हें तुमचे महाराजही जाणतच असतील. आतां जरी आमचे आरमार त्यानें नेऊन मोठी नुकसानी केली, तरी तह करण्याच्या कामांत तो आम्हांस फारच उपयोगीं पडल्यामुळें त्याचे आम्हांवर फार मोठे उपकार झाले आहेत. दुसरें, उभयतांसही त्रासापासून लवकरच मुक्त होण्याची संधि आली आहे. ती अशी कीं, त्यास एक प्रचंड तारूं सांपडलें आहे, व त्यांत बसून त्यास समुद्रावर निघून जातां येईल असें तें आहे. तें त्यानें किनाऱ्यावर आणिलें असून त्याच्याच मदतीनें व सल्ल्यानें त्यावर सामानसुमान भरण्याविषयीं आम्हीं हुकूम दिला

आहे. तेव्हां थोडेच दिवसांत ह्या ‘ नाकापेक्षां जड मोत्या’-च अेझें उतरले जाऊन दोन्ही राष्ट्रें सुख पावतील असा संभव आहे. ’

हा जबाब त्या वकिलास मिळाल्यावर तो लिलिपट येथें निघून गेला, व त्यानंतर ही झालेली हकीकत बादशाहानें मला सांगितली. तो आणखी असेंही म्हणाला कीं, ‘ तुम्ही आमचे पदरीं रहात असल्यास आमचा तुम्हांस पूर्ण आश्रय आहे ’ परंतु ही गोष्ट तिसरे कानीं मात्र जातां कामा नये असें त्यानें मला फार फार बजावून सांगितलें. हें त्याचे बोलणें जरी मला खरें वाटलें, तरी होईल तेथपर्यंत राजे व प्रधान यांजवर इतःपर विश्वास ठेवावयाचा नाहीं असा माझा निश्चय झाला होता. यास्तव बादशाहास मीं नम्रतापूर्वक सांगितलें कीं, ‘ महाराजांनी कृपा करून मला आश्रय व आश्वासन दिलें याबद्दल मी महाराजांचा फार आभारी आहे; परंतु ही गोष्ट मला कर्तव्य नाहीं, तर याबद्दल मला क्षमा असावी. आणखी ज्या अर्थी माझ्या सुदैवानें म्हणा, अगर दुर्दैवानें म्हणा, मला जहाज आयतें सांपडलें आहे, त्या अर्थी येवढ्या दोघां महापराक्रमी राजांच्यामध्यें वितुष्टास कारणीभूत होण्यापेक्षां मला समुद्राचीच जोखीम पतकरणें बरें वाटतें. ’ या माझ्या बोलण्याचें बादशाहास कांहीं एक वाईट वाटलें नाही असें दिसलें, एकदां तर कोणत्याशा एका गोष्टीवरून त्यास या माझ्या निश्चयाचा आनंदच वाटला असें माझ्या समजण्यांत आलें; व याचप्रमाणें त्याच्या बहुतेक प्रधानमंडळासही सदर्हू गोष्टीचा हर्ष वाटला.

या सर्व कारणांवरून माझा निघण्याचा बेत कांहीसा पूर्वीपेक्षांही लवकर झाला. आणि दरबारी मंडळीसही एकदांचा मी केव्हां जाईन असें झालें होतें, सबब त्यांनीं मला त्या कामीं चोहोंकडून मोठ्या तत्परतेनें साह्य केलें. माझ्या होडीस

दोन अवजारें पाहिजे होतीं तीं करावयास ९०० कारागीर लाविले होते. त्यांकरितां त्यांस तेथील अतिशय जाड तागाचें कापड बारातेरा पदरी करावें लागलें तेव्हां ती माझ्या सांगण्याप्रमाणें झाली. दोरखंडें करण्यास तर मला मोठाच त्रास पडला. कारण, त्यांची अतिशय जाड आणि बळकट अशीं दहा, वीस, तीस इतकीं चऱ्हाटें मला एकत्र वळावीं लागलीं, तेव्हां तीं तयार झाला ! तसेंच पुष्कळ वेळ शोध करतां करतां समुद्रकिनाऱ्यावर एक मोठा दगड सांपडला, तो मला नांगराच्या ऐवजी उपयोगीं पडला. वल्ही व शिडें करण्याकरितां मला मोठमोठीं झाडें तोडतांना जे काहीं श्रम पडले ते सांगितले असतां कोणास खरें देखील वाटणार नाहीं ! तरी या कामी मला सरकारी जहाजांवरील सुतारांनी पुष्कळ मदत केली. ती अशी कीं मोठें काम म्हणजे झाडें तोडण्याचें वगैरे मी उरकल्यावर लांकडें तासून नीट नेटकीं करून त्यांवर रंधा फिरविणें हीं कामें बहुतेक सर्व त्यांनीच केलीं.

वर सांगितलेलीं सर्व कृत्यें आटपण्यास सुमारें एक महिना लागला. मग सर्व तयारी झाल्यावर मला जाण्याविषयीं हुकूम मिळावा म्हणून मी बादशाहास सूचना पाठविली. तेव्हां बादशाह आपल्या सर्व परिवारासह राजवाड्याबाहेर आला. बादशाहाच्या हाताचें चुंबन घेण्यासाठीं मी आडवा पडलों, तेव्हां त्यानें मोठ्या प्रेमानें तो पुढें केला. त्याचप्रमाणें राणीसाहेब व राजघराण्यांतील इतर माणसांनीही प्रेमपूर्वक आपापले हात मला चुंबन घेण्यासाठीं पुढें केले. बादशाहानें मला दोनदोनशे स्प्रगजांच्या पन्नास थैल्या व आपली भरउंचीची एक तसबीर बक्षीस दिली. ती खराब होऊं नये म्हणून मीं आपल्या हातमोज्यांत घालून ठेविली. याखेरीज माझ्या निघण्याचे वेळीं दुसरे पुष्कळच आदरउपचार झाले; ते सर्व सांगितलें असतां वाचकांस कंटाळा येईल म्हणून सांगत नाहीं.

मीं होडीमध्यें शिधासामग्री व पाणी वगैरे बरेच दिवस पुरण्याजोगें घेतले. तसेंच चारशें आचाऱ्यांकडून तयार करवलें तितकें शिजलेलें अन्नही घेतलें. आणखी मीं आपल्या बरोबर सहा गाई, दोन बैल व तितक्याच मेंढया आणि एडके घेतले; व कुर्मधर्मसंयोगानें आपण स्वदेशीं गेल्यास तेथें त्यांची वाढ करावी असा माझा उद्देश होता. त्यांस खाण्याकरितां मीं होडीत एक पिशवीभर धान्य आणि गवताची पेंढी घेतली. थले दहाबारा लोकही आपल्या बरोबर घ्यावे अशी माझी फार इच्छा होती. परंतु या कामास बादशाह अगदीं परवानगी देईना, व त्यानें माझ्या खिशाचा झाडा घेऊन खेरीज, 'तुमच्या रयतेंपैकीं कोणाही इसमास, त्याची इच्छा व अनुमत असलें तरी मी बरोबर घेऊन जाणार नाहीं,' असें त्यानें मजकडून वचन घेतलें.

वर सांगितल्याप्रमाणें मजकडून जेवढी झाली तेवढी सर्व गोष्टींची तयारी करून मी १७०१च्या सप्तंबरच्या २४ व्या तारखेस सकाळीं सहा वाजतां होडींत बसून निघालों. मी समुद्रांत उत्तरेचे बाजूस बारा पंधरा कोस निघून गेलो तों बरोबर दिव्यांत वात पडण्याची वेळ झाली; आणि वाऱ्याचा रोंख बदलून आग्नेयीकडे झाला. इतक्यांत त्या ठिकाणापासून सुमारें पाऊणएक कोसाच्या अंतरावर वायव्य दिशेकडे एक बेट माझ्या दृष्टीस पडलें. मग मी अंमळसा पुढें गेलों, व त्या बेटाच्या जवळच वाऱ्याच्या पाठमारा नांगर टाकला. या बेटांत वस्ती वगैरे कांहीं नसावी असें दिसलें. नंतर मी थोडासा फराळ करून झोंपीं गेलों. मला मोठी नामी झोंप लागली. निदान ६ तास तरी मी निजलों असेन असें वाटतें; कारण मी जागा झाल्यावर दोन तासांनीं पहाट झाली. त्या रात्रीं [illegible] ढग वगैरे अगदीं आले नव्हते. मी सूर्योदयापूर्वीं न्यहारी

करून होडीचा नांगर उखळला त्या वेळीं वाराही अनुकूल सुटला होता. मीं आदल दिवसाप्रमाणेंच उत्तरेचे बाजूस होडी चालविली. या कामीं माझें होकायंत्र माझ्या फार उपयोगीं पडलें. माझा असा अदमास होता कीं, वानडीमन्सलांडच्या ईशान्येकडे कांहीं बेटें असावीं; व साधल्यास त्यांपैकीं एखाद्या बेटास जाऊन लागावें, असा माझा बेत होता. पण त्या सगळ्या दिवसभर माझ्या कांहीं एक दृष्टीस पडले नाहीं. परंतु दुसरे दिवशीं दुपारीं सुमारें तीन वाजतां मला एक जहाज आग्नेयीकडे जात आहेसे दिसले. या वेळीं माझ्या हिशेबीं मीं ब्लेफुस्कूपासून सुमार ३५ कोसांवर आलों होतों. तेथून मीं पुष्कळ हांका मारिल्या, पण मला कांहीं जबाब मिळाला नाहीं. परंतु इतक्यांत वारा पडल्यामुळें मी त्यास खास गांठतों असें मला वाटल. मी आपली होडी खूब जोरानें चालविली, तेव्हां सुमारे अर्ध्या तासांत मी त्या जहाजावरील लोकांच्या दृष्टीस पडलें। मग त्यांनीं आपलें निशाण फडकावलें, आणि एक बंदुकीचा आवाज केला. या वेळीं, माझा प्रिय देश, व त्यांत असलेले माझे पंचप्राण हे आतां माझ्या पुनः दृष्टीस पडणार अशी मला आशा उत्पन्न होऊन जो कांहीं पराकाष्ठेचा आनंद झाला, त्याविषयीं लेखणीनें कितीही लिहिलें अथवा तोंडानें कितीही सांगितलें तरी पुरे होणार नाहीं. मग त्या जहाजावरील लोकांनीं शिडें सैल केलीं; न मी त्या दिवशीं म्हणजे सप्तेंबरच्या २६ व्या तारखेस संध्याकाळीं पांच व दहा वाजण्याचे दरम्यान त्यांजपाशीं जाऊन पोहोंचलों. जहाजाचें निशाण इंग्रजी आहे असें पाहून तर माझ्या अंतःकरणांत आनंदोदकाचा सागरच उचंबळूं लागला! मीं आपल्या गाई, बैल व मेंढ्या वगैरे बंडीच्या खिशांत टाकिल्या, व जें थोडेंसें धान्य व खाण्याचे पदार्थ होते ते घेऊन

जहाजावर चढलों. तें जहाज एका इंग्लिश व्यापाऱ्याचें असून जपान देशाहून उत्तर व दक्षिण समुद्रांतून परत जात होतें. त्यावर डेप्टफर्ड येथील जॉन बिडल नामें गृहस्थ कप्तान होता. हा मोठा हुषार दर्यावर्दी असून सभ्य चालीचा मनुष्य होता. या वेळीं आम्ही दक्षिणेकडे तीस अक्षांशांच्या सुमारास होतों. जहाजावर अदमासें पन्नासएक माणसें होती. त्यांत माझा एक जुना सोबती पीटर विल्यम्स् नांवाचा होता. त्यानें माझ्या चांगल्या वर्तणुकीबद्दल कप्तानाजवळ शिफारस केली. त्या गृहस्थानें माझी फार चांगल्या रितीनें व्यवस्था ठेविली. व तुम्ही कोणत्या ठिकाणाहून निघालां होतां व कोठें जाण्याचा तुमचा इरादा होता वगैरे हकीकत त्यानें मला विचारिली. ती मीं त्यास थोडक्यांत सांगितली. ती ऐकून त्यास असें वाटलें कीं, याजवर महत्संकटें गुजरल्याकारणानें याच्या बुद्धीस भ्रंश होऊन हा बरळत आहे. तेव्हां मीं लागलींच आपल्या खिशांतून तीं काळ्या रंगाचीं जनावरें काढून त्यास दाखविलीं; त्यावरून त्यास पराकाष्ठेचें आश्चर्य वाटून माझ्या खरेपणाबद्दल त्याची पूर्ण खातरी झाली. त्यानंतर, ब्लेफुस्कूचे बादशाहानें मला दिलेलें सोन्याचें नाणें, व त्याची सबंध उंचीची तसबीर, आणि त्या देशांतील दुसऱ्या उत्तम चिजा, ह्या मीं त्यास दाखविल्या. तसेंच त्यास दोनदोनशें स्प्रग्जांच्या दोन थैल्या बक्षीस केल्या; व इंग्लंडांत गेल्यावर एक गाय व एक मेंढी देण्याचें कबूल केलें.

आतां या जलपर्यटनाचे संबंधानें सर्व हकीकत तपशीलवार दिली असतां वाचणाऱ्यांस कंटाळा येईल म्हणून तसें करीत नाहीं. तरी इतकें सांगणें इष्ट आहे कीं, हा बहुतेक प्रवास आम्हांस फार सुखाचा गेला. आम्ही १७०२ च्या एप्रिल महिन्याचे १३ वे तारखेस डाउन्स खाडींत येऊन दाखल

झालों. गलबतावर माझें फक्त एकच नुकसान झालें; तें हें कीं माझी एक मेंढी उंदरानें नेली. बाकीचीं सर्व जनावरें सुखरूप आलीं. त्यांस मीं ग्रीनिच येथें चेंडू खेळण्याचे मैदानांत चरावयास सोडिलीं. तेथील नामी गवत तीं मोठ्या आनंदानें खाऊं लागलीं. पण पहिल्यानें या गोष्टीचा मला संशयच वाटला होता. हीं जनावरें येवढ्या दूरच्या प्रवासांत अन्नावांचून मरावयाचींच. परंतु कप्तान दररोज मला त्यांस घालण्याकरितां थोडी चपाती देत असे यामुळें तीं वाचलीं. ती चपाती मी त्यांस पाण्यात कुसकरून खावयास घाली. मी इंग्लंडांत असतां हीं जनावरें लोकांस दाखवून बराच पैसा मिळविला; व दुसऱ्या सफरीस निघतांना तीं ६००० रुपयांस विकून टाकलीं. तेव्हांपासून आजपर्यंत त्या सर्वांची, त्यांत विशेषतः मेंढ्यांची, पुष्कळच वाढ झाली आहे. ह्या मेंढ्यांची लोंकर फारच तलम असल्याकारणानें लोकरीचे कपडे विणणाऱ्या कारागिरांस त्यांपासून चांगला फायदा होईलसें दिसतें.

मी आपल्या गृहांगणांत फक्त काय तो दोनच महिने राहिलों. कारण दूरदूरचे देश पहाण्याची माझी जी उत्कट इच्छा ती तिळमात्र देखील कमी झाली नव्हती, यामुळें आणखी मला रहावेना. मीं आपले बायकोस रेड्रिफ येथें एक घर घेऊन दिलें, व तिजला १९००० रुपये रोख दिले. मीं आपला बाकीचा पैसाअडका व्यापार वगैरे करून नफा मिळविण्याच्या इराद्यानें, सर्व बरोबर घेतला. माझा सर्वांत वडील चुलता जॉन् हा वारला होता. त्याची एक जमीन होती तिचें सालीना उत्पन्न ३०० रुपयांचें होतें. खेरीज माझें स्वतःचें एक कौलानें घेतलेलें शेत होतें त्याचेंही वरच्याइतकेंच उत्पन्न होतें. याशिवाय आमची उपाध्येपणाची वृत्ति होतीच. तेव्हां

आतां माझ्या कुटुंबाच्या माणसांस खाण्यापिण्याची बिलकूल ददात उरली नाहीं. मला एक मुलगा होता त्याचें नांव जॉनी. तो हल्लीं उजळणी संपवून कागदावर आला होता. त्याची बुद्धि फार तीव्र असे. माझी मुलगी बेटी ही या वेळीं कशि-द्याचें काम शिकत होती. मी आपली बायको, मुलगा व मुलगी ह्यांचा निरोप घेऊन, सुरतेस एका व्यापाऱ्याचें जहाज चाललें होतें त्याजबरोबर निघून गेलों. निघण्याचे वेळीं त्यांच्या व माझ्याही नेत्रांतून प्रेमाश्रूंच्या कांहीं वेळपर्यंत सतत धारा चालल्या होत्या. असो, याप्रमाणे माझ्या पहिल्या सफरी-

…कत या भागांत संपली. आतां दुसऱ्या भागांत दुसऱ्या सफराची हकीकत देण्याचा माझा विचार आहे.

**भाग पहिला समाप्त.**

PRINTED AT THE "INDIRA" PRESS, POONA.